शारदा मंडळ प्रकाशन



प्रकाशन पहिलें

# गाजराच्या पुङ्ग्या

( विनोदी काव्यसंग्रह )



शारदा मंडळ प्रकाशन

## भा व ना - प्र धा न

( सामाजिक कादंबरी )

## विभाचीं नग्न सत्यें

( आत्मकथा )

## स म ग्र क वि ता

( कवि गो. रा. हिंगणेकर )

शारदा मंडळ प्रकाशन

# अनुक्रमणिका





‘ गाजराच्या पुंग्या ’चें संपादकीय निवेदन–

सामुदायिक स्वरूपाचा विनोदी व विडंबन काव्यसंग्रह यशस्वी रीतीनें निघू शकेल की नाही, याबद्दल शारदा मंडळांतील इतर सदस्यांप्रमाणें माझेंही मन साशंक होतें. आणि म्हणूनच पूर्व तयारीच्या वेळीं प्रस्तुत काव्यसंग्रहाची योजना केसरी, महाराष्ट्र, वसुंधरा, विहार, इत्यादि वृत्तपत्रांतून जाहीर करतांना पुस्तकाचें नांव ‘ गाजराच्या पुंग्या ’ असेंच लिहिलें होतें. तें अभिधान देण्यांत अंतस्थ हेतु हाच होता कीं, नियोजित कल्पनेला मूर्त स्वरूप प्राप्त झालें नाहीं, तर त्या पुंग्या वाजल्या नाहींत म्हणावयाच्या आणि बुभुक्षित टीकाकारांना खाऊन टाकण्यास सांगायच्या !

शाब्दिक कोटीवर व्यक्तीला जगतां येत नसलें तरी जिवावर बेतलेलें शेपटीवर निभावून घेतां येतें.

सुमारें सव्वातीनशें कवींच्या व कवियित्रींच्या कविता आमच्याकडे आल्या. महाराष्ट्राच्या सांदीकोपऱ्यातून 'इतक्या' ठिकाणी काव्यप्रतिभा विभागून पडल्या असतील, अशी कल्पना आम्हांस स्वप्नांतसुद्धां शिवली नव्हती. प्रत्येक कवीला आपल्या 'उत्कृष्ट' अशाच चार पांच कृति धाडण्याबद्दल आम्ही लिहिलें होते. परंतु आलेल्यापैकी किती तरी कविता वाचून पाहतांना, त्या कलाकृति पाठविणाऱ्या कवीची आपल्या काव्याकडे पहाण्याची वृत्ति, स्वतःच्या सुरूप, कुरूप अशा सोळासहस्र 'बिळ्यांच्या' जनानखान्याकडे समसमान दृष्टीनें पहाणाऱ्या अनंतकोटी, ब्रह्मांडनायकाप्रमाणें लोचट होती, असा तर्क करण्यास आम्हांस पुरेशी जागा सहजच मिळाली.

कोणती कविता या प्रातिनिधिक संग्रहाकरितां निवडावयाची, हा प्रश्न सोडविण्यासाठी पांच साहित्यिकांचे एक परीक्षक मंडळ नेमण्यांत आलें. कुठल्याही कवीच्या प्रसिद्ध अप्रसिद्धीचा बरावाईट परिणाम कविता निवडणाऱ्यावर कविता निवडतांना होऊं नये, म्हणून आलेल्या सर्व कवितांच्या प्रति, लेखकाचें नांव वगळून तयार करण्यांत आल्या होत्या. यामुळें खऱ्या मोलाचीच कविता निवडून येऊं शकली. हा जसा एक फायदा झाला, तसाच एक तोटाही झाला; तो असा की, कांहीं सुप्रसिद्ध कवींच्या व कवयित्रींच्या मुद्दाम मागविलेल्या कवितांना आम्हांस मुकावें लागलें ! या घटनेबद्दल मी प्रस्तुत काव्यसंग्रहाचा संपादक म्हणून माझ्यावर पुष्कळांचा रोष होण्याचा संभव आहे. परंतु त्याला माझा नाइलाज आहे. एकदां मंडळानें नेमलेल्या परीक्षक मंडळाबाहेर मला जातां येणें शक्य नव्हतें.

पसंत केलेल्या प्रत्येक कवितेला एक व्यंग चित्र घालावयाचें ठरलें. प्रत्येक कवीला चित्राची कल्पना पाठविण्याबद्दल व्यक्तिशः पत्रेंही लिहिलीं. ज्यांच्या कल्पना पद्धतशीर रीतीनें आणि वेळेवर आल्या त्यांना आपली कविता चित्रालंकारानें नटलेली दिसेल.

कांहीं प्रसिद्ध कवींना फोटो पाठविण्याबद्दल लिहिलें. फोटोंत जे सुस्पष्ट होते त्यांचे ब्लॉक्स् करण्यांत आले. ब्लॉकला फोटो कसा लागतो याची कल्पना नसल्यानें कित्येक कवींनीं कांहींतरीच फोटो पाठविले होते.

या संग्रहाचें कार्य चालू असतांनाच आपल्या आवडीचे तीन विद्यमान कवी कोण ? असा प्रश्न निरनिराळ्या व्यक्तींना खाजगी व छापील पत्रकें पाठवून विचारण्यांत आला होता. त्यामध्यें महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख वृत्तपत्रांचे संपादक, विद्वान, विदुषी इ. इ. यांचा अंतर्भाव झाला होता. विनंतीला मान देऊन बहुतेकांनीं वेळेवर उत्तरें पाठविलीं. सर्व उत्तरें येथें स्थलाभावीं देणें शक्य नाही. आणि दुसरें कारण असें कीं, बऱ्याच जणांनीं पडद्याआड राहण्याची इच्छा प्रदर्शित केली; परंतु बहुतेक उत्तरांतून श्री. केशवकुमार, श्री. मनमोहन, श्री. ज. के उपाध्ये, श्री. चं. ग. दीक्षित, प्रो. मायदेव इ. इ. ठराविक नांवांचाच उच्चार होत होता.

आलेल्या उत्तरांतून प्रतिनिधिक स्वरूपाची थोडीं निवडक पत्रें खालीं देत आहे. अर्थात् प्रसिद्धीबद्दल ज्यांनी अनिच्छा दर्शविली नाहीं, अशांचीच हीं आहेत.

× × ×

(१) वि. ग. ताम्हणकर (संपादक–बालबोध)

......तरी आमच्या मताप्रमाणें आम्ही पुढील तीन नांवें कळवीत आहोंत.

१ केशवकुमार—

यांची कविता साधी, आंत जिव्हाळा भरपूर आणि खोंच भरपूर. पुन्हां कवीचा अभिनिवेश नाहीं.

२ कवि मनमोहन—

अत्यंत शीघ्र कवि. कोणत्याही विषयावर त्यांस काव्य करावयास सांगा, ते हटकून यश मिळवायचेच. त्यांची 'तेज'मधील विडंबनें न वाचणारा मनुष्य विरळाच सांपडेल. मनमोहन यांची भाषा नखरेल असून त्याच गुणावर त्यांनीं नटींचीं हृदयें काबीज केलीं आहेत.

३ चं. ग. दीक्षित—

यांचें एकत्र काव्य 'कॉलेजचें विश्व' त्यांना नवोदित कवींत स्थान देण्यास पुरेसें आहे......

× × ×

(२) प्रो. आर. व्ही. ओतूरकर, एम्. ए.

......विद्यमान आवडत्या कवींत मला

(१) श्री. अत्रे ( केशवकुमार ) यांचा नंबर १ ला वाटतो.

(२) श्री. नातू ( मनमोहन ) यांचा नंबर २ रा वाटतो.

तिसरें मला कोणीं आठवत नाहीं. माझें अधिक वाचन नाही......

× × ×

(३) सौ. ताराबाई कुलकर्णी, बी. ए., मेयो गार्डन्स, लाहोर.

......आपण पाठविलेल्या स्लिप्स् पोहोंचल्या.

महाराष्ट्रांतील पुढील दोन विनोदी कवींच्या कविता मला जास्त आवडतात:—

(१) श्री. केशवकुमार......

(२) श्री. चं. ग. दीक्षित......

× × ×

(४) व्ही. काळे.

......विद्यमान तीन आवडत्या कवींचीं नांवें विचारलीत...... माझा काव्याशी संबंध अलीकडे कांहीं वर्षे पूर्वीइतका राहिला नाही. तरी पण पुण्याच्या दैनिक वृत्तपत्रांतील चालू घडामोडीवरील व्यंगत्व उपरोधिकपणें दर्शविणाऱ्या कवि मनमोहनांच्या कविता मी कौतुकानें वाचतों. नंबरच लावावयाचे झाले तर मी असे लावीन:—मनमोहन, केशवकुमार, गो. ल. आपटे......

......लिहावयास सवड नाहीं; परंतु......पुढेंमागें या विषयावर मी जास्त लिहूं शकेन......

× × ×

(५) ज. म. गोखले, बी. ए., संपादक ‘ किरण ’.

...... I got your letter dated the 3rd inst. and want to offer my thanks for the same. To tell you the truth......I appreciate and like the humour of

Mr. P. K. Atre ( Keshav-Kumar ) and that of Mr. G. N. Natu ( Manmohan )......

× × ×

(६) रघुनाथ विद्वांस.

......संस्कृतप्रचुर, प्रतिभासंपन्न आणि गंभीर कवितांचा मी उपासक आहे. गालावरच्या खळीपेक्षां गहन विचारांचा उद्‌बोध देणारी कपाळावरील आडवी आठीच मला काव्यविषय होईल असें वाटतें......हें मी सांगतों याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, विनोदी कवितांचें व माझें वावडें आहे, किंवा आपल्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें मला टाळावयाचें आहे. तरी......आधुनिक विद्यमान कविब्रुवांत श्रेष्ठ असलेले कवी आणि केवळ श्रेष्ठ विनोदी कवी असे कोणी वेगवेगळे आहेत, असें मला वाटत नाहीं. याचें कारण असें कीं......आज जे श्रेष्ठ दर्जाचे विनोदी कवी म्हणून लौकिक मिळविते झाले आहेत असे श्री. केशवकुमार, श्री. मनमोहन, श्री. मायदेव,......या तिघांची गंभीर काव्यरचनाही त्यांच्या विनोदी किंवा विडंबन रचनेइतकी प्रसिद्ध आहे......मी असेंही म्हणेन कीं, केशवकुमारांना ‘ मुग्धप्रणय ’, मनमोहनांचा ‘ प्रकटशृंगार ’ मायदेवांना ‘ करुणभाव ’ हास्यरसापेक्षां जास्त उठावानें रगवितां येतो... माझ्या वैयक्तिक आवडीप्रमाणें अनुक्रम लावावयाचा झाला, तर तो मी असा लावीन:—

१ श्री. केशवकुमार ( अत्रे ).

२ श्री. मनमोहन ( नातू ).

३ प्रो. मायदेव.

केशवकुमार—

आधुनिक विडंबक कवींतील अग्रेसर कवी म्हणून जर कोणाचा उल्लेख करावयाचा झाला, तर तो कवी केशवकुमार यांचाच करावा लागेल... त्यांच्या कवितांचे वर्ण्यविषय अत्यंत साधे, म्हणजे समाजांतील दररोज घडणारीं उदाहरणें, अशा स्वरूपाचे असतात. त्यांची भाषा अत्यंत साधी व त्याचप्रमाणें उपमाही खोचक व विनोदी. यांचें प्रत्यंतर त्यांच्या ‘अरुण’ या कवितेवरून येण्यासारखें आहे......

त्यांच्या विडंबक काव्याविषयीं सांगायचें झालें तर असें सांगतां येईल कीं, त्यांची विडंबन काव्यें हीं अत्यंत मार्मिक व हंसविणारीं अशीं असतात. ज्यांच्या कृतीचें विडंबन केलें आहे त्यांनासुद्धां तें विडंबन पाहून राग न येतां एक प्रकारें कौतुकच वाटेल अशाच तऱ्हेची त्यांची विडंबक काव्यें आहेत. याचें उदाहरण त्यांच्या "......स,' 'सांग कसे बसले,' 'पाहुणा' 'कादरखां,' 'कवी आणि कवडा' व 'पाय घसरला तर' वगैरे कविता होत...मी 'यशवन्त'चा वाचक होण्यास श्री. केशवकुमार यांच्या कविताच प्रामुख्यानें कारण होत. त्या वेळेस त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या 'पत्रें लिहिलीं पण,' 'प्रेमाचें अद्वैत' वगैरे कवितांचा उल्लेख करणें अवश्य आहे......

मनमोहन—

त्यानंतर श्री. अत्र्यांची प्रतिभा नाटकाकडे वळल्यानंतर रोडू लागलेल्या मराठी विनोदी काव्यसपत्तीत सख्येनें आणि गुणानें जर कोणी बहुमोलाची भर घातली असेल तर ती. श्री. 'मनमोहनांनींच' होय.

श्री. अत्र्यांप्रमाणें त्यांची भाषा साधी नसते. आधुनिक कॉलेज कुमारी प्रमाणें त्यांची कविता–वधु नखरेल दिसते. ह्याचें प्रत्यंतर त्यांची " गाईराणी गोडगाणी." " पुजारीण," ' ूर्तीभंजन' वगैरे कवितांवरून दिसून येतें.

प्रखर प्रतिभेचें अभिदान असून केवळ बेफिकीरपणामुळें शीघ्र लिहायाची त्यांनीं संवय ठेवल्यामुळें रसिक त्यांच्याकडून ज्या सुदर काव्य. निष्पत्तीची अपेक्षा करतात, तशी काव्यनिष्पत्ती त्यांच्याकडून ोत नाहीं.

श्री. यशवंताप्रमाणें उज्वल प्रभाव आणि श्री. गिरीशांप्रमाणें संवेधक शब्द योजण्याची त्यांची शैली आधुनिक पुष्कळ उदयोन्मुख कवींनीं उचलली आहे.

'ईश्वरी कृपेनें मुडदा जिवंत झाला.'

या शीर्षकाखाली एक सुप्रसिद्ध हकीम आपली जाहिरात केसरींत देत असे.

त्यावर श्री. 'मनमोहन' यांनीं एक दोन ओळींची कविता रचली होती. तीं खालीं देत आहे.

'कृपा ईश्वराची 'मुडदा' जिवंत झाला'
आणि कृपा हकिमाची जिवंत मुडदा झाला.

या दोनच ओळी त्यांच्या प्रासगिक विनोदाचा नमुना आहे. दुसऱ्या एखाद्या कवीनें कदाचित ओळीच्या संख्येंत भर टाकून रसहानीचा दोषही पदरांत घेतला असता.

मागणीप्रमाणे पुरवठा न करतां त्यांनीं थोडेंच पण सुंदर लिहावें अशी माझ्यासारख्या त्यांच्याकडून उच्च काव्याची अपेक्षा करणाऱ्या अनेक साहित्यिकांचें अपेक्षा आहे.

श्री. मायदेव.

लोकांच्या स्मरणांतून नाहीसे झालेले परंतु एके काळीं आपल्या विनोदी साभिनय काव्यगायनांनी बरेच प्रसिद्धीस आलेले कवि म्हणजे श्री. मायदेव हे होत.

मी त्यांचे नांव घेतलेलें पाहून अलिकडचे पांच सहा वर्षांचा ज्यांचा काव्यविषयाशीं सबंध आहे, त्यांना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. आणि ते 'My God' हा कोण मायदेव असे उद्‌गार काढतील.

शारदा समेलनाच्या प्रथम अधिवेशनाच्या वेळीं 'हिज हवा ग आय. सी. एस.' ही कविता त्यांनीं स्वतः गाऊन दाखविलेली मी ऐकली. ती इथें मला उल्लेखनीय वाटते.

या तीन कवीनीं अशीच वाङमयसेवा पुढें चालवावी असें मला वाटतें.

× × ×

(७) श्रीकृष्ण कीर्तनें नागपूर ( सीताबर्डी )

.........पत्र पावलें. विनोदी विडंबन काव्य करण्यांत श्री. अत्रें, श्री. मनमोहन यांचा हात आधुनिक मराठी कवींत कोणी धरील असें मला वाटत नाही. श्री. मायदेव याच्याही कविता बऱ्या असतात. परंतु श्री. जयकृष्ण उपाध्यांच्या कवितेंतील रसप्रसाधनत्व त्यांच्यांत नाही. .........माझ्या स्वतःच्या आवडीचे असे तीन कवि म्हणून मी .........काव्यांत देतों.

१ केशवकुमार.

२ मनमोहन.

तिसरें नांव लिहितांना माझ्यापुढें रा. जयकृष्ण उपाध्ये, आणि कृष्ण शास्त्री घुले अशीं दोन नांवें उभीं राहतात. तरी.........

× × ×

(८) ना. तु. ठाकूर; B. A. संपादक, 'तेज.'

.........आपण विनोदी कवींचा काव्यसंग्रह प्रसिद्ध करीत आहांत याबद्दल आनंद वाटतो. अलीकडच्या कवींमध्यें—

१ श्री. केशवकुमार.

२ श्री. मनमोहन.

३ चं. ग. दीक्षित.

या कवींचीं नांवें विनोदामुळें डोळ्यापुढें विशेष उभीं राहतात. परंतु अव्वल दर्जाच्या इंग्रजीतील 'पंच' सारख्या साप्ताहिकांत प्रसिद्ध होणाऱ्या कवितांप्रमाणें मराठी विनोदी कविता माझें पाहण्यांत नाहीं..........

× × × ×

(९) बी. जी. आपटे ( शांता आपटे यांचे ज्येष्ठ बंधू )...आपण विचारलेल्या प्रश्नास उत्तर म्हणून माझ्या आवडीचे तीन विनोदी कवी कळवीत आहे.

१ केशवकुमार.

२ मनमोहन.

३ मायदेव. (हे तिन्हीही कवी मला सारखेंच आवडतात )

सध्यां सवड नसल्यामुळें सविस्तर कळवितां येत नाहीं....राग नसावा...

× × ×

(१०) आर. बबाली 'सकाळ'

...माझ्या मतें मराठींतील विनोदी आवडते कवी खालीलप्रमाणें आहेत.

१ प्र. के. अत्रे.

२ कवी मनमोहन.

× × ×

(११) आनंदराव टेकाडे, महाल, नागपूर.

...पत्रक मिळालें. खालीं लिहिलेले तीन विद्यमान विनोदी कवी मला आवडतात.

१ वे. शा. सं. कृष्णशास्त्री घुले, नागपूर शहर.

२ श्री. जयकृष्ण केशव उपाध्ये, नागपूर शहर.

३ श्री. केशवकुमार ( प्रि. अत्रे ) पुणें शहर.

(१२) अ. गो. बी. फडके बी. एस्.सी.

आपण विचारलेल्या प्रश्नास उत्तर म्हणून माझ्या आवडीच्या तीन विनोदी कवीचीं नांवें कळवीत आहे.

१ केशवकुमार.

२ मनमोहन.

३ पंडित सप्रे.

या कवीच्या कविता माझ्या विशेष वाचनांत आल्यामुळे मी हीं तीन नांवें पाठवीत आहे.

× × ×

(१३) मनमोहन. ( गो. न. नातू. )

आवडत्या विद्यमान तीन विनोदी कवीचीं नांवें मला अशी वाटतात.

१ केशवकुमार.

२ जयकृष्ण उपाध्ये.

३ गो. ल. आपटे.

नाना फडणिसाच्या वेळेला हे 'त्रिकुट' फुटक्या बुरुजावरील 'फडा'-वर असतें, तर त्या 'बस्टरकीटन'चा यांनी 'चार्ली चापलीन' करून टाकला असता—सरसनिरसतेचा निर्वाळा या एवढ्या पत्रांत.......

माझ्या आयुष्यांत दुःखानें भरलेल्या क्षणांनाही ज्यांच्या पद्यरचनेनें... त्यांचा उल्लेख करण्याची संधी आपण मला आणून दिलींत, याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे......

× × ×

(१४) सौ. गंगूताई कोकिळ, B. A. ( कोल्हापूर )

......श्री. न. चि. केळकर, श्री. प्र. के. अत्रे, व सं. रा. कर्णीक हे माझे विद्यमान आवडते कवी आहेत...शेवटच्या दोन कविद्वयांच्या

कविता प्रसिद्ध झाल्याच आहेत. श्री. केळकर विनोदी कवी म्हणून प्रसिद्ध नसले तरी मार्गे ' आमच्या खेडेगांवचें स्वराज्य ' या नांवानें जी कविता प्रसिद्ध झाली होती, ती उच्च, मार्मिक विनोदाची साक्ष पटविणारी असल्यानें ' गाजराच्या पुंग्यांत '......समावेश करावा म्हणून हें पत्र लिहित आहे. इतर आणखी विनोदी......

× × ×

(१५) वि. घों. कुळकर्णी, सहसंपादक ज्ञानप्रकाश

......आपल्या पत्राला थोडचा वेळांत उत्तर देणें कठीण आहे. मराठींत उच्च दर्जाचे विनोदी वाङ्मय थोडें व त्यांतून विनोदी काव्य-वाङ्मय तर त्याहोपेक्षां थोडें पहावयास मिळतें. मराठी वाङ्मयांत विनोदी काव्यनिर्मितीला प्रारंभ श्री. केशवकुमार ( प्रि. प्र. के. अत्रे ) यांनीं केला' पण अलीकडे त्यांची नवीन विनोदी वाङ्मयकृति फारशी पहावयास मिळत नाहीं. मराठी नियतकालिकांतून सध्यां विनोदी काव्यें किंवा विडंबन गीतें दर अंकांत प्रसिद्ध होत असली, तरी खऱ्या रसिकाच्या हृदयाला आनंद होईल अशा तऱ्हेची काव्यें त्यांत क्वचितच आढळतात. त्यामुळें विनोदी काव्यवाङ्मयाची निपज पुष्कळ होत असली तरी टिकाऊ स्वरूपाची काव्यनिष्पत्ति फारशी होत नाहीं, असें नाइलाजानें म्हणणें भाग पडतें. त्यापेक्षां विडंबन काव्याची स्फूर्ति होणाऱ्या या कवीनीं थोडें नियमन केलें तर चांगली काव्यनिर्मिति होऊ शकेल. व्यक्तिद्वेषापासून अलिप्त, सदभिरुचीला बाध न आणणारी व खऱ्या रसिकांच्या हृदयाला आनद देणारी काव्यनिर्मिती करण्याचें ध्येय या कवींनीं आपल्यापुढें ठेवावें हें बरें.

श्री. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांच्या लिखाणांत उपजत विनोदी बुद्धि पहावयास मिळते. पुणें येथील कविसंमेलनांत त्यांनीं वाचन दाखविलेलें विनोदी काव्य ज्यांनीं ऐकलें असेल त्यांना ते चांगले विनोदी कवीही असल्याचें दिसून आलें असेल.

प्रो. वा. गो. मायदेव यांनींही विनोदी कविता लिहिल्या असून, त्या वरच्या दर्जाच्या विनोदी वाङ्मयांत स्थान प्राप्त होण्यासारख्या आहेत.

औंधच्या राजकन्या श्रीमंत अक्कासाहेब पंत यांनीं प्रसिद्ध केलेल्या

" भावलेखा " या काव्यसंग्रहांतील कु. मालती किर्लोस्कर यांच्या " उपास मज लागला " व " जावईबाबा " या दोन विनोदी कवितांवरून त्या उदयोन्मुख विनोदी कवयित्री असल्याची खात्री पटेल. संख्येच्या बाबतींत श्री. मनमोहन यांचा नंबर पहिला लागेल. तरी हें असूनही या विडंबनाकरितां विडंबन असें धोरण न ठेवतां खरोखरीचे विनोदी प्रसंग कवीनें चतुराईनें रंगविलें तर अधिक चांगला विनोद निर्माण होतो......

विनोदी कवीच्या बाबतींत अनुक्रम लावण्याचें काम फार कठीण आहे पण अनुक्रम लावावयाचाच झाला तर मी पुढीलप्रमाणें अनुक्रम सुचवीनः——

(१) श्री. प्र. के अत्रे.

(२) श्री. न. चिं. केळकर अगर प्रो. वा. गो. मायदेव.

(३) श्री. मनमोहन अगर गो. ल. आपटे......

× × × ×

(१६) **Bee-Madhao** :

...... To express my personal opinion about the best poet-satirists of Maharashtra in whose humour I find interest......

I have occasionally an appetite for Mr. **Keshav -Kumar's** tuneful humour in respect of his poetry to forget for a moment the prosaic environmen- around me......for a necessary delightful refresh ment. His is the business of humour, often fruitful and winning.

Similarly I am......interested in musing a while over Mr. **Manmohan's** verses displaying at times a rare mark of intelligence in igniting a spark of talented humour. Occasional but unhealthy sarcasm pricking in the marrow is usually a prominent characteristic with his poems. He is slipshod in Construction.........He is absorbing and Preads pleasant.

Pandit Sapre is concise in expression. By rich themes delicately introduced under the fine embroidery of light humour the fibres he sets of a reader's heart melodiously humming. He is pleasing in diction......

× × ×

(१७) गो. ल. आपटे, बी. ए., एल्‌एल्‌. बी., पुणें.

......आधुनिक विद्यमान तीन कवींमध्यें रा. मनमोहन व रा. प्र. के. अत्रे हीं दोनच नांवें मी निवडतों.

१ मनमोहन ( गो. न. नातू ).

२ प्र. के. अत्रे ( केशवकुमार. )

......रा. अत्रे यांच्या ताज्या...कविता प्रसिद्ध होत नाहीत...... चालू विनोदी कवीत मी रा. मनमोहन यांना पहिलें स्थान देत आहे. अर्थात् रा. प्र. के. अत्रे यांना दुसरी जागा....

× × ×

(१८) व. सी. हरोलीकर.

......माझ्या आवडत्या कवीबद्दल विचारलें......एखीच्या जीवन-क्रमांत जें वाङमय मी वाचे आणि वाचतों, त्यांत काव्याला अत्यंत थोडा काळ खर्ची पडत असे. स्वभावतः माझा गद्यवाचनाकडे ओढा फार. सुबुद्ध मनाला भावनेवर आधारलेल्या पद्य वाङमयापेक्षां विचारप्रधान गद्य ग्रंथच अधिक रुचतात......

पण भोपळ्याची भाजी न आवडणारा मनुष्यही बुडूं लागताच नाक न मुरडतां भोपळ्याचाच आधार घेतो.

काव्याकडे---विशेषतः विनोदी काव्याकडे सहानुभूतीनें पहाण्याची वेळ मला ३२ सालीं येरवड्यास आली. कांहीं विशिष्ट पुस्तकांचाच तिथें शिर-काव होई. आपल्या आवडीचीं पुस्तकें तेथें मिळणें अशक्य होई. तेव्हां हाताला येईल तें पुस्तक वाचावेसें वाटे. श्री. अत्र्यांची 'झेंडूचीं फुलें, श्री. मनमोहनच्या 'अफूच्या गोळ्या' हीं मी एरव्ही वाचलीं असतीं कीं नाहीं कोणास ठाऊक. पण त्या वेळीं त्यांतील कविता हें एक भरपूर करमणु-

कीर्चें साधन होऊन बसलें होतें. माझ्या आवडीचे व मीं वाचलेले हे दोघच विनोदी कवि मला दिसतात.

× × ×

(१९) जी. व्ही. कानडे, B. Sc.

पत्र पावलें......आधीं मराठींत विनोदी कवि अत्यंत थोडे आहेत... तसें साप्ताहिकांतून व मासिकांतून रविवारी व शनिवारीं कविता लिहिणारे पुष्कळ आहेत. पण त्यांपैकी झटकन लक्षांत रहातील असे कवी नाहींत आणि अशा कविताही नाहींत. रा. अत्रे व रा. मनमोहन यांच्या कविता माझ्या वाचनांत आलेल्या आहेत. माझ्या मतें......

१ श्री. अत्रे (केशवकुमार).

२ श्री. नातु (मनमोहन).

असे गुणानुक्रम लागतात. श्री. अत्र्यांच्या कवितेत शब्द साधे आणि विषयही साधे, याच्या उलट श्री. मनमोहन त्यांचे विषय 'हेतुपुरस्सर' आणि भाषा आजकालच्या कॉलेजकन्येसारखी 'अपटुडेट'. या दोन कवींच्या नंतर श्री. मायदेव, देव, उपाध्ये, दीक्षित वगैरे नांवें डोळ्यांपुढें येतात. पण.....

× × ×

(२०) दा. न. शिखरे. एम. ए. ( सं. केसरी. )

आधीच एकंदर मराठी वाङ्मयांत विनोद कमी. त्यांत कवितेच्या संकोची स्वभावाला तर विनोद फारसा न मानवलेला. त्यामुळें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेंच थोडे विनोदी कवि डोळ्यांपुढें येतात. त्यांतही अवास्तव शृंगार किंवा अतिरेकी विडंबन यांनाच विनोद समजण्याची गफलत पुष्कळ वेळां होते, ती टाळून तीन विनोदी कवीचीं नांवें सांगावयाची तर......

१ 'झेंडूचीं फुलें' कर्ते श्री. प्र. के. अत्रे.

२ 'कॉलेजचें विश्व' कर्ते श्री. चं. ग. दीक्षित.

३ 'तेज'मधील दैनिक कवितांचें कर्ते श्री. मनमोहन.

× × ×

(२१) कु. कुमुदिनी प्रभावळकर, बी. ए. मुंबई.

......प्रश्नाचें उत्तर माझ्या मतें......

नं. १ प्र. के. अत्रे.

नं. २ अनंत काणेकर.

ह्यांच्या विनोदी कविता थोड्या असल्या, तरी त्यांतील विनोद अस्सल जातिवंत आहे......विडंबनात्मक कविता थोड्या आहेत, तण अव्वल दर्जाच्या आहेत......मूळ कवीच्या भावना न दुखवितां त्याच्या काव्याचें विडंबन करणें फार अवघड काम! हवे तसे चिमटे काढणें सोपें असतें, पण हळुवार गुदगुल्या करणें कठीण असतें......

प्र. के. अत्र्यांनीं विनोदी व विडंबनात्मक काव्य पुष्कळ केलें आहे... तरी विनोदी व विडंबनात्मक काव्याचें महत्व संख्येपेक्षां गुणावरच अवलंबून असतें.

नं. ३ संराक......

× × ×

(२२) रा. बा. कुळकर्णी, काव्यतीर्थ.

......मराठी भाषेमध्यें अभिजात विनोदी कविता अजून निर्माण व्हावयाची आहे. आतांपर्यंतचें विनोदी काव्य मूळच्या वर्ण्य विषयाची विकृति करण्यांतच रंगलें. मूळच्या रसास्वादाला व सौंदर्याला धक्का न लावता अर्थपरिस्फुट असा मर्मविनोद उत्पन्न करणें हें विनोदी कवीचें खरें कार्य आहे. पण श्री. केशवकुमार व त्यांच्या संप्रदायांतील कवी हे मूळच्या काव्यविषयाची सौंदर्यहानि करून तो कवी व त्याचें काव्य ह्यांचें विडंबन करण्यांतच रंगले. थॅकरेनें "A good wit should give us pleasure, at the same time making us good and happy" ह्यांतील 'good' हा शब्द महत्वाचा आहे. ह्या दृष्टीनें पाहतां त्यांतल्या त्यांत विद्यमान मराठी कवींत मनमोहन व दीक्षित यशस्वी झाले आहेत.

× × × ×

(२३) गो. म. लाड ( सहसंपादक, सकाळ )

......आपल्या पत्राबद्दल आभारी आहे. महाराष्ट्रांतील विनोदी काव्याची निर्मिती फारच तुटपुंजी असल्यामुळें त्यांच्यांत क्रमांक लावण्याची आजच जरूरी आहे असें मला वाटत नाहीं......मतें मागविलीं...... मी माझें मत देत आहे......उपाध्ये व अत्रे यांचा अनुक्रमें पहिला व दुसरा नंबर लागतो. तिसऱ्या नंबरासाठीं......मनमोहन मायदेव दीक्षित हे स्पर्धा करीत आहेत. व त्यांचानिकाल देण्यास कालावधि जावा लागेल.

× × ×

(२४) डॉक्टर सौ. यमुनाबाई सहस्त्रबुद्धे.

रा. रा. अत्रे यांच्या कविता मला चांगल्या वाटतात. दुसरें मनमोहन यांचें नांव विनोदी कवि म्हणून ऐकूं येतें; पण त्यांच्या कविता माझ्या वाचनांत फारशा आल्या नाहीत. तिसरे मायदेव यांच्याही कविता विनोदी असतात......

मी लावलेला अनुक्रमः---

१ अत्रे ( केशवकुमार ).

२ मनमोहन.

३ प्रो. मायदेव.

× × ×

(२५) श्री. लीलाताई भाटे.

......कवि श्री. अत्रे यांचा क्रम विनोदी विद्यमान कवीत पहिला असावा असें माझें स्वतःचें मत आहे. त्यांच्या कवितेंत भरलेला हास्यरस मला आवडतो. कवि श्री. मनमोहन यांच्या कविता माझ्या तितक्याशा वाचनांत आल्या नाहींत......त्यामुळें मला आपले तीन कवी...... कळवितां येत नाहीत.

× × ×

अतिशय दूर अंतरावर असलेल्या ध्रुव ताऱ्याकडे पृथ्वीवरील कोणत्याही लोहचुंबकाचें एक विशिष्ट टोंक सदोदित आकर्षिलें जावें; तसेंच वर उद्धृत केलेल्या प्रातिनिधिक पत्रावरून बहुजनसमाज मराठींतील विनोदी

काव्यरचनेच्या मानाचें प्रथम स्थान कोणाकोणाच्या असामान्य गुणावर लुब्ध होऊन आपण होऊन अर्पण करतो, हें सहज आणि सतत दिसून येईल. आणि त्या मानाच्या स्थानांस आपल्या निसर्गतःच प्राप्त असलेल्या विनोदी लेखन, संभाषण इत्यादिकांच्या योगें पात्र असलेल्या श्री. केशवकुमार व श्री. मनमोहन या दोन प्रतिभासंपन्न कवींचें मी या ग्रंथाचा संपादक या नात्यानें शारदा मंडळाचे वतीनें हार्दिक अभिनंदन करतों. श्री. केशवकुमार हे मुंबईस व श्री. मनमोहन हे मद्रासेस गेल्यामुळ आजच्या प्रकाशन-समारंभाच्या गोड प्रसगीं त्यांना येथें जातीनें येण्यास आमंत्रण देणें शक्य झालें नाहीं.

प्रो. मायदेव, श्री. संराक, श्री. चं. ग. दीक्षित. श्री. जयकृष्ण केशव उपाध्ये, अनंत अंतरकर, पंडित सप्रे, वे. शा. सं. कृष्णशास्त्री घले, श्री. गो. ल. आपटे यांचाही उल्लेख वर प्रसिद्ध केलेल्या व दप्तरांत अप्रसिद्ध असलेल्या पत्रांतून वेळोवेळीं आलेला आहे. यावरून तेही अभिनंदनास पात्र आहेत.

शंभराधिक कवींच्या व कवयित्रींच्या कविता या संग्रहांत आलेल्या आहेत. हा विस्कळित काव्यसभार एकत्रित आणतांना अनेक ज्ञात अज्ञात मित्रांची मला सहानुभूतीपूर्वक मदत झाली. याबद्दल मंडळातर्फे मी त्यांचे आभार मानीत आहे. त्यांत आर्टिस्ट श्री. ज. म. गोखले, बी. ए. ( संपादक किरण ) यांचे उपकार विशेषच होत.

ता. २० डिसेंबर ३५ } आर. वी. समुद्र, बी. एस्सी.
शारदा मंडळ, पुणें

---

शारदा मंडळाचें यापुढील प्रकाशनः—
गद्यः भावनाप्रधान
पद्यः कै. गो. रा. हिंगणेकर, माजी सहसंपादक, ज्ञानप्रकाश
यांची समग्र कविता.

[कवि **मनमोहन** यांस धाडलेल्या खाजगी पत्रातील एक उतारा ]

. .... .. आणि आपली अनुमती घ्यावयास आलो असताना आपण या गोष्टीला संमति दिली नाहीत .... या प्रकाशन समारंभाच्या वेळी आपण येथून बरेच दूर आहात ........ आपण महाराष्ट्राचे आवडते कवि आहात, पण व्यक्तिशः माझे सुहृद आहात. आपली वाङ्मयीन मैत्री अनेक 'उन्हाळ्यापावसाळ्यां'त आजवर टिकून राहिली आहे ..... . प्रतिकूल परिस्थितीच्या वातावरणात वावरत असताना कितीतरी वेळा आपल्या नितान्त सुंदर कवितांनी माझ्या लोचनांच्या दुःखाश्रूंचे 'पाणिग्रहण' केले आहे. महाराष्ट्रातील मराठी वाङ्मयप्रेमी रसिकांनी आपल्याला मानाचे 'दुसरे' पद दिल्याचे आनंदवृत्त आपणास कळवून मी संपादन केलेला **'गाजराच्या पुंग्या'** हा काव्यसंग्रह आपणास आपल्या अनुमतीशिवाय अर्पण करीत आहे ........

**माधव प्रिंटिंग, पुणे.**

# गाजराच्या पुङ्ग्या



## गाजराच्या पुङ्ग्या—

कवि—श्री. आर. बी. समुद्र, B. Sc. पुणें.

कवि एकेकटाच भारी पडतो आजकाल वाचकांना ।
या येळकोटापरि तें जमावानें येता काय उडेल दैना ? ।
टीकाकार झिटा येउनि पडातिल खालीं टाकुनी नांग्या ।
नाहींच वाजल्या तर खायच्या मोडून गाजराच्या पुङ्ग्या ।

\+ + +

पूर्वी अगस्तिनें आचमनें घेउनि केला खलास समुद्र ।
आणि आज कवी पुंगवांनीं आटविला " आर. बी. समुद्र " ।



# पोळ—

कवि—श्री. सीताराम महादेव बापट, शहापूर.



नंदीश्वर हा राजपथावर चाले डौलानें
मनीं थिजावें दिमाख त्याचा बघुनी नृपतीनें
वर्ण गौर अति सतेज मांसल देह भव्य साचा,
गिरिराजासहि खचितचि हेवा वाटावा याचा.

डरकाळी हा फोडित उकरी भूमि नखाग्रांनीं,
प्रतिस्पर्धी हा कोण उदेला मेघ म्हणे गगनीं !
गर्वाचा हा अभंग पुतळा अखिला अवमानी,
अजिंक्यपत्रें लिहुन दिलीं त्या नंदीबैलांनीं,

आल्या गेल्या रोखुनि शिंगें भिवत्री मत्त असा,
लेखणिनें भय दावि लेखकां टीकाकार जसा.

गुंडगिरी हा अखंड करुनी लाजवि गुंडाला,
दंड कराया परंतु याला धैर्य न कोणाला.

समोर दिसतां वाट करोनी देती जन याला,
वाटे म्हण ही खरी 'बळी तो कान पिळी' मजला !
देवाचा हा बैल म्हणोनी कुठें नसे बंदी,
वंदी भाविकजन आवडिनें वर देई चंदी.
पोळ नांव या टोळापरि हा गांवांतुन फिरतो,
फार माजला सदा उपद्रव लोकांना देतो.
बुवा मठाला जसा तसा हा शोभा गांवाला,
स्वैर वृत्तिचा मक्ता दिधला शास्त्रानें ज्याला.
कुठेंहि जावें, खावें-प्यावें, मजेंत हिंडावें,
धुंडावेंही शेत दुजाचें उगाच तंडावें
सुखी सर्वदा स्वतंत्र मानी स्वच्छंदें रमला
स्वतंत्रता सुखदायि सत्य हें शिकवी हा सकलां.
श्रमाविना हें लाभे पशुला उत्तम भाग्य असें;
वृषभ-जन्म जर वांछी कोणी तर तें नवल नसे.



# आइस्क्रीम आणि प्रेम—

कवि—रघुनाथ विद्वांस, पुणें.

( जाति–अपर्णा )



तिच्यावर त्याचें प्रेम अगदीं ‘बेबी’पासून
परि ती नव्हती बघत त्याकडे ढुंकून
नखरेल अशी कीं जणुं कविता ‘मनमोहन’ची
नितंबावर नागफणी डुलते श्याम केसांची १
एक दिवस संपली मॅच ती गेली हॉटेलीं
‘लक्की रेस्टॉरंट’ इराणी आंत शिरे ही भोळी
पडछायेपरि करि पाठलाग तरुण हल्लींचा
त्याला प्यावेंसें वाटे अधरामृत रंग लाल ओठांचा २
कॉम्रेड परी बोडका ‘लेनिन’चा ग्रंथ खांकोटी
ती सखि व्हावी जिवाची ही आस परी पोटीं
मागविली हिम-साय ( Ice-Cream ) तिनें, हा सिंगलवर खूष
तिजकडे पहात बसे ती निघुन जाई उदास ३
अशक्य वाटली त्याला गोष्ट अमृतप्राप्तिची
—उठला ताड्दिशीं एकान्तीं चव बघे—उष्टया चमच्याची !

# आमचा हिंदुस्थान 'मुक्तात्मा' केव्हां होईल?—

कुमारी–वासंती–मुंबई.



जेव्हां बेकीचा गाडला जाईल संपूर्ण अग्यावेताळ।
'मुंबई'ला कोणी न कुणाचें टाळकें शेकाया पाहील॥
व्याघ्र-शेळी जसे सर्कशींतिल 'चरती' एक ताटीं।
तसे भालाकार शोकतल्लि, दाढि-शेंडि गाठीं॥
–जेव्हां कॉलरा होउनी 'बालू' कोंकणचा आडवा होईल।
–जेव्हां कत्तलखां त्याची शश्रुषार्थ थुंकी झेलील॥



# कासारदादा—

कवि—श्री. सरपाटील, कोल्हापूर.

[ वृत्त—इंद्रवज्रा ]

“ कासारदादा धरि घट्ट हाता !
दाबूं नको तूं ! हळु घोळ आतां !
रक्ताळ झाला मृदु हात माझा !
लागे खरारा जणुं हात तूझा ! ॥ १ ॥




ही घाल गा, सुंदर बांगडी तूं !
फोडूं नको हो, जपुनी परंतु !
लागेल गा कांच हळूच सार !
दादा, नको आवळ फार फार ! ॥ २ ॥
हे क्लेश भाऊ तुज काय बोलूं !
वाढेल गा, सैल नकोच घालूं !
दादा रुचेना म्हणणें तुला कां ?
रे सोड नीचा ! धर तूज धक्का ! ! ॥ ३ ॥

# मांजरीची म्यांव-म्यांव—

कवि—श्री. स. पांडित, पुणें.

[ प्रामाणिका वृत्त ]



द्विपाद एक पाहिला, जयास पुच्छ डोकिला ।
न श्रृंगही परी जिथें कसा फिरे जिथें तिथें ॥ १ ॥

विपक्षता तरी उडे प्रवाल वेंचण्या बुडे ॥
धरातलीं तसा दडे, गिरीश-शीषही चढे ॥ २ ॥

चराचरासि जिंकतो, शुभाशुभासि धाकतो ॥
उलूक भालु शब्द त्या, करी निशब्द ऊठता ॥ ३ ॥

असा विचित्र पूतळा, प्रभातिं आडवा अला ॥
सबंध काल भागल्यें, करीं न अन्न लागलें ॥ ४ ॥

पयांश ना मला मिळे, न मूषकांहि पाहिलें ॥
असाचि काळ कंठल्यें, सदा निजांग चाटल्यें ॥ ५ ॥

धरावि एक चीमणी, प्रयोजुनी निजांगणीं ॥
पदांसि ठेवि चोरुनी, न तोंच भुंकतें शुनी ॥ ६ ॥

तईच पाठ उंचवी, स्वपुच्छ फुल्ल फुल्लवी ॥
नितांत रक्षणा करीं, प्रयत्न ते परोपरी ॥ ७ ॥

झुकांडी देउनी निघें, तयां घरांत कीं रिघें ॥
पिलांत एक तें कमी, बघून रूदना क्रमी ॥ ८ ॥

प्रतिध्वनी तरूंतुनी, तदाच येई ऊठुनी ॥
प्लवंत हाति सांपडे, अचूक पोर बापडे ॥ ९ ॥

क्षणांत पाजलें करी, क्षणांत सोडलें करी ॥
तयास माय तोतया, बसून उंच फांदियां ॥ १० ॥

गतासु होउनि सुटे, अखेर खालिं आपटे ॥
विपत्तिपूर लोटतो, जरी मनुष्य भेटतो ॥ ११ ॥



# नर्तकीस—

कवयित्री-कुमारी शरा, कलकत्ता.



घुंगट कंचनी वर नको नेउं झपाट्यांत ।
खवळतील कविभ्रूवांच्या स्फूर्तीचे झोत !
बघुन तुझा हा कामुक अहेव पदन्यास !
संस्कृतिसंरक्षक मंडळाचा होइल प्राणखलास !

× × ×

चोरून पहातों गॉगल चष्म्यांतुन तुजला !
मी ‘वाङ्मय फिल्टर,’ तूं अश्लील भासशी मला !



# शाबास रे ग्रामोद्धारक !—

शं. ब. कुलकर्णी, केडगां



ग्रामोद्धार करावयास मजला, झाली असे प्रेरणा ।
उच्चाटावि सुरालयें सकलही, ऐसें पुढें ये मना ॥
खेडोखेडिं फिरोनि जागृति जनीं, व्हायास हो पाहिजे ।
मित्रोक्ती परिसोन मींहि म्हटलें, सानंदुनि हें किजे ॥१॥
आहे हा बरवा विचार म्हणुनि मी देणगी अल्पशी ।
देवोनी इतरांसही सुचविलें, हें ध्येय ध्या मानसीं ॥
सायंकाळीं फिरावया सहज मी, गेलों तिथें पाहिलें ।
मद्यागारिं खुशाल मित्र अमुचे, मद्यांत ते रंगले ॥ २ ॥
आम्हां मोळवटां न अक्कल पुरी, ऐसें मला वाटलें ।
त्यांची ओळख साग्र मीं मिळविली, वाचाळ ते ऐकलें ॥
नामांकित वकील ते जरि तरी, दारू पिणारे पुरे ।
बाता झोंकुनि देणगी उपटली, ध्यानीं धरा हें खरें ॥ ३ ॥



# ती—

P. N. NATU पुणें.

वृत्त—चंचला

अपराध नसतांही करि चतुर्भुज आदमी ।
अबला विशेषण मागें, परी केवढी रुस्तुमी ॥
मोकळे केसांचे धागे कैचींत पकडति नवल ? ।
भडकतें रॉकेलहूनहि, या खुदा ! लोचनीचें जल ॥१॥

## बेकारांचे निःश्वास—

कवि—श्री. म. वेदपाठक, उरण.

कठिण दिवस हे कसे उगवले बेकारीचे असे,
नशिब कां फुटकें अमुचें असे ॥ १ ॥




मॅट्रिक होउनि, बी. ए. होउनि, जॉब धुंडण्या अम्ही ।
फिरतों घिरट्या घालित कसे ॥ २ ॥
किती कंपन्या, किती कचेऱ्या, दिसती डोळ्यांपुढें,
खरडितों अर्जहि त्यांना बरें ॥ ३ ॥
परन्तु ऐका गतिही त्यांची कान देउनि बरें,
किती तरी मौजेची ती असे ॥ ४ ॥
शेंकडों अर्जहि एकावरी,
त्यांतही वशिलेवाले किती !
अन् नाशिब, ताण करित त्यावरी,
परिस्थितीला किंकर करण्या झगडा रात्रंदिनीं
प्रार्थितों हात दोन जोडुनी ॥

# जातिवंत प्रेम—

कवि—कांचनमृग, अमृतसर.



रोग्याचा मित्र विचारी काळजींत डॉक्टराला ।
" हा जगेल कां हो ? " डोळ्यांत पूर अश्रूंला ।
उत्तरले बेकार एल्. सी. पी. एस्. " हा मरणार " ।
" हाय ! " म्हणे मित्र "करावें मृत्युपत्र तयार" ।
गेला जवळ लागला कानाशीं रुग्णाच्या ।
" मित्रा कर विभागण्या तव उदंड इस्टेटीच्या" ।
म्हणाला रुग्ण " द्या तिच्या नांवचें सारें करुन " ।
मित्र विचारी " अरे, 'ती' म्हणजे रे कोण ? "
" ती म्हणजे आपुली सोनुकाकु सैंपाकिणबाई ।
तिचेंच कच्चें अन्न खाउनि मी मरतों पाही ! "

# लाडके !—

कवि—श्री. ग. गो. सोमण, वडद.

जरी असतों सखे झालों तुझ्या वेणींतला गजरा ।
तरी स्वर्लोक गमता हा मला भूगोल गे सारा ॥
तुझ्या डोळ्यांवरी चष्मा जरी मी जाहलों असतों ।
कटाक्षा प्रीतिच्या सहजीं तरी सत्पात्र मी होतों ॥
नथेमाजीं तुझ्या असतों जरी मी झुरूमुळी मोतीं ।
तुला मनसोक्त चुंबाया गडे संधी मला होती ॥
अहा ! कां जाहलों नाहीं, तुझ्या स्कंधावरी हार ।
गमे सौंदर्यवंतीचा मला मिळता खरा बहर ॥
सुखानें जाहलों असतों तुझ्या हातांतला पंखा ।
तरी मिळतां मला सखये सदाचा प्रीतिचा तनूखा ॥
कटीची मेखला कां गे तुझ्या मी जाहलों नाहीं ।
अभागी प्रेमवेड्याला कशाचा लाभ तो होई ! ॥
तुझ्या मांडीवरी सदये मजेनें झोंप मी घेतों ।
जरी लडिवाळ आवडता तुझा बुल्डॉग मी होतों ॥
जरी होतों पायमोजा तुझ्या पायांतला नामी ।
तरी मी धन्य या जगतीं तुझ्या येवोनिया कामीं ॥
मऊसा बूट गे होतों जरी मी उंच टाचांचा ।
सुदैवें लाभता मजला तुझ्या सहवास चरणांचा ॥

× × ×

अहाहा ! लाडके—आणखी कांहीं तरी झालो असतों तर—?



# माझी चंद्रिका ?—

कवि-प्रो० बा. रा. बोकील, एम्. ए. ग्वाल्हेर

अजुनि चंद्रिका न ये घरिं !
वाट किती मी पाहुं तरी ॥ ध्रु० ॥
आकाशांतिल रम्य चांदणी ।
दुरुनि सुखविते नयनांलागुनि ।
स्पर्श तियेचा भूतलिं कोठुनि ।
सखी 'चांद्रिका' तेंवि खरी ॥ १ ॥
व्याख्यानाची आवड तिजला !
ओढ क्लबाची फार मनाला !
मैत्रिणिचा नित भोंवतिं मेळा !
वेळ कसा मग मिळे तरी ? ॥ २ ॥
वाट तियेची बघता होई
ताप मना मम ! विधुरा परिही
असे अवस्था बहु दुखदाई !
वाटेल कुणा तरि खरें परी ? ॥ ३ ॥
व्याख्यान न कां अजुनि संपलें ?
रात्र जाहली, आठ वाजले !
अजुनि न माझें स्मरण जाहलें ? ।
तिजविना पल गमे युगापरी !" ॥ ४ ॥
दार वाजलें आली गमतें
भाग्य उदेलें ! येति शब्द ते
कानीं—परि हें कोण ? कोण तें ?
मनीं ? हळू ती म्यॉंउ करी ! ॥ ५ ॥

---

# कविजनां आज ना मान !—

कवि—आर. व्ही. कुलकर्णी, नागपूर

लोपले सुदिन । कविजनां आज ना मान ॥ ध्रु० ॥
काव्यावांचुन नीरस जग हें
महिमा त्याचा कुणा न ठावें ?
अरसिकांस परि काय वदावें !
कळा ये हीन । कविजनां आज ना मान ॥ १ ॥
जन मानस डुलविलें जयांनीं
निजकाव्याची भुरळ घालुनी
एकमेव अद्वितीय ठरुनी
मिळविला मान । कविजनां आज ना मान ॥ २॥
स्फूर्तिफुलांचे मळे फुलविले
प्रथित यशानें तयां राखिलें
सौगंधानें जना मोहिलें
कृतीहि न सान । कविजनां आज ना मान ॥३॥
प्रेमी जीवा नसे आसरा
कवि-रसवंतीविना दूसरा
विरहानल जो शमावितो झरा
निघे कोठून ? । कविजनां आज ना मान ॥ ४ ॥
संपादक कपि वैरी अमुचा
नाश करी सुंदर काव्याचा
दावा साधी गतजन्मीचा
काळ ये कठिण । कविजनां आज ना मान ॥ ५ ॥

---

# देशील मातें जरी !

कवि—श्री. ना. गं. लिमये, बी. ए., एल्. टी., मुंबई.

[ सुनीत ]

स्वर्गा खेंचिन खालती ढकलुनी खालून पाताळ मी।
इंद्राणीस चुरावया पद तुझे लावीन मी विक्रमी ॥
ने द्रोणागिरि मारुती झणिं जसा लीलाभरें गे शिरीं।
तूंतें शांतविण्यास नंदनवना आणीन मी भूवरी ॥
वेणी सुंदर ती तुझी रजनिच्या काळेपणा जी हरी।
तीमाजीं रचुनि स्वयें गगनिचीं नक्षत्रपुष्पें करी ॥
नामी गज्जल वा सुनीत रचुनी गाईन तूझेवरी।
'अन्' ओवाळुनि हा 'जिता जिव' तुझ्या ठेवीन पायांवरी ॥
ठेवाया तिळगूळ, कोर शशिची वाटी रुपेरीच ही।
स्वर्गंगाहि भगीरथासम तुझ्या स्नानार्थ आणीन ही ॥
पुच्छें तोडुनि धूमकेतुवरचीं ढाळीन मी चामर।
गेहीं इंद्रधनू-कमान तुझिया लावीन मी सुंदर ॥
सूर्याची करण्या सुरेख कढई आणीनि सैंपाघरीं।
कांद्याची गरमागरम् पण भर्जी, देशील मातें जरी !

# विरस कसा झाला !—

कवि— वै. ल. पेंडसे, मुंबई.

[ जाति—चंद्रकांत ]

संध्यासमयीं उडी सागरीं घ्याया रवि सिद्ध
दिसे, परी रमणीच्या मोहें मन होई विद्ध !
अशाच वेळीं मित्र-युग्म, नर, नारी, युव-युवती
बंधू-भागिनी श्रम-परिहारा सहल सुखें करिती.
झुळुक वायुची स्पर्शचि करितां जन आल्हादूनी
भवचक्राच्या आधि-व्याधी विसरति सहज क्षणीं.
प्रिया वदे, "उद्यानीं जाऊं फिरावया मधुरा !
त्रस्त मनाला नको तोषवूं विलंब मम चतुरा !"
मीहि निघालों फिरावया जों मम रमणी वदली
अर्धांगी ती—परि मी अर्ध्या तिच्याच वच मुकुलीं !
तोष—धन्यता वाटे चित्ता नाना पुष्प-लता
नाना रंगी मधुर सुगंधी पुष्प-तती दिसतां,
हंसरी मोहित गंधित बालिश देखुनि एक कळी
वदे सखी मज, "तोडुनि द्या ती कलिका मजजवळी !"
मनास वाटे कलिका उत्सुक करीं उडी घ्याया
तोडणार तों शब्द निघाले, "मत् काटो भय्या !"
कोण बोललें, विस्मय वाटे कलिका-जननी कां ?
दिक्कालांतुनि शब्द प्रकटले कीं बोले कालिका ?
वदे शिपाई दंडा पेलित, "मालुम् नै तुमकू ?—
नही तोडना इधर कोइ फुल !—चलो जाव घरकू !"

*    *    *

विरमुनि गेलों एका वाक्यें,—विरस कसा झाला ?
कसा ? कुणाचा ?—रसिक जाणती—नको लिहायाला !

# मोटार हांकनेवाला——

दत्तात्रय कालगांवकर, कऱ्हाड.

हा कोण इथें पडलेला । मोटार-हांकनेवाला ।। ध्रु० ।।
ठिगळली 'पाटलुण' मुळची । माखली अहाहा चिखलीं ।
कोटाचीं नित सुटलेलीं । बटणेंही तुटुनी गेलीं ।।
माकडी टोपि खाकीची । बाजूला भिउनी बसली ।
बरगड्या नि हाडें सगळीं । छातीचीं उघडीं पडलीं ।
पुस्तकें तिकिट-विक्रीचीं ।
चुरगळलीं रंगित साचीं ।
मोडली पेटि काड्याची ।
करुं नकाच 'चिल्लर' गोळा । मोटार हांकनेवाला ।।
त्या अड्ड्यावरले लोक । जाहले भोंवतीं गोळा ।।
"घडली ह्या अद्दल खाशी" । कुणितरी हळुच पुटपुटला ।।
अत्यवस्थ कोणि प्रवासी । कुंथत दे गाली त्याला ।।
विरली ती वाफ चहाची ।
बशि निवली पार भज्यांची ।
तशि गारही ती मिसळीची ।
परि 'गार' कधींचा पडला । मोटार हांकनेवाला ।।
करिल कोण काळे ओठ । सोडुनी धुरांचे लोट ? ।।
दे कोण वेग गाडीला । ढोसुनी ताडिचा घोट ? ।।
त्या पाण्यावरति चहाच्या । कां भरेल कोणी पोट ?
बुडवील मालकां कोण । 'बोकडां' भरुन दुप्पट ? ।।
अड्ड्यावर सोडुनि गाडी ।
गुत्त्यांतिल पिउनी ताडी ।
कुणि चढेल रंगित माडी ।

जइं खिसा 'गरम' भरलेला । मोटार हांकनेवाला ।।
करुं नका गलबला अगदीं । झोपुं द्या तयास निवान्त ।
क्षणभरही नव्हता शान्त । कामानें झाला श्रान्त ।
जन्मांत असा कितव्यानें । पडलासे हा रस्त्यांत ? ।
ही कायमची सुख-निद्रा । व्यापांतुन होईल मुक्त ।।
नाकावर धरिलें सूत ।
जर उठेल तो निमिषांत ।
पुनरपी करिल अपघात ।
मग म्हणाल पुरता भंवला । मोटार हांकनेवाला ।।

---

## संपादकास--

कवि--शि. अ. लुकतुके, सावंतवाडी.

[ मोरोपंती आर्या ]

परतून धाडलीसे कविता संपादका, सहाभार,
रडलों ढळढळ बसुनी चोरुन जेथें गुडुप्प अंधार
परि टवटवीत झालों संपुन जातांच अश्रु नेत्रीचे
सांपडला कवितेला विषय नवा 'थँक्स' हें असो तुमचे
'द्राक्षासव' हें माझें काव्य म्हणोनी तुलाच धाडियलें
परत टपालीं आलें, कां कारण तें मला अतां कळलें !
अस्तु अतां 'द्राक्षासव' बंद करोनी जुनाटसें करतों
गुणकारी मग होतां मूल्य भरानें तुलाच तें विकतों. !!

---

## सख्यास—

कवि—त्र्यं. गं. घारपुरे, सहसंपादक-लोकमित्र, मिरज.

किती तरी । बघावी घरीं । तुझी मी वाट ॥
सिद्धताही केली सर्व ठेविला पाट ॥
गुंतसी— । कुठें चौकशी । करावी सांग ? ॥
अंतरंग माझें सख्या ! नको करूं भंग ॥
भरवसा । धरावा कसा । अतां यापुढती ॥
चालली सरत जी दिली वेळ त्वां होती ॥
त्यामुळें । ध्यान लागलें । तुझें मम डोळां ॥
वाजले दहा, कां विसरलास येण्याला ॥
ये तरी । गड्या सत्वरी । नापिता आतां ॥
त्रासलों असे मी फार, दूर कर चिंता ॥



## लई त्याहून ब्येस नाङ्गूरऽः—

कवि—बा. थो. बुलबुले, बार्शिटाकळीकर, वऱ्हाड.

अर् गड्या बिरामृग्यान ऽ तुझं तुलाच-हावुंद प्यार ऽ ॥ ध्रु० ॥
माझी जिमिन् बरी
सोनियाची चिरी
तिच्या पायांचा मी ऽ र चाकूर ऽ ॥ १ ॥
अर शिवारांत
माझे मळे सात
देवकिरपेन् नाहीं कमती ऽ र ॥ २ ॥

माझ्या सोन्या रुपा
गेंदा, वाडा सुपा
काय गांवांत जोड ह्याला ऽ र ऽ ॥ ३ ॥

न्हाई कर्जपाणी
पुरी आबादानी
गुराढोरांचं माझं खिलार ऽ ॥ ४ ॥

आतां आला दिस्
जरि नउऽतीच
गड्या सोडील कोण घरदार ऽ ॥ ५ ॥

ममइला जाऊन
थूःर चाकूर होवून
कोन् जिवाचं करि मातेर ऽ ॥ ६ ॥

माय जिमीन खास
होउन तिच ऽ दास
राखून तिच्यांत गुरंढोरं पोरं ऽ ॥ ७ ॥

नग ताबेदारी
उरावरी सुरी
लई त्याहूना ब्येस नाङ्गूर ऽ ॥ ८ ॥

---

# फ्रेंच कट

कवि--'वीरानुयायी' आष्टे.

दिण्डी

उच्च शिक्षण घेण्यास विदेशाला ।
मित्र गेलेला परत अतां आला ।
तया पदवीचें पुच्छ लागलेलें ।
वृत्त ऐकाया उत्सूक चित्त झालें ॥

म्हणुनि गेलों मी भेटण्यास त्याला ।
तदा खुर्चीवरि स्तब्ध बैसलेला ।
बदललेला पोशाख सर्व त्याचा ।
जणूं साहेबचि विलायती साचा ॥

परी होतों मी खूण न्यहाळीत ।
अरे रे रे नापास हा खचीत ।
तरिच ऐसा हा स्तब्ध बैसलेला ।
मिशा नाहिंत ही खूण पहा त्याला ॥

इथुनि गेला जेधवां विदेशाला ।
मान पदवीचा श्रेष्ठ मिळविण्याला ।
तदा केला उपदेश मीं तयास
पहा करितिल ते नापास विलास ॥

हिन्द तरुणांना मोहवी विदेश ।
मोह सोडुनि सांभाळ तरि मनास ।
पीळ देउनि तो म्हणाला मिशीस ।
मिशी काढिन नापास जाहल्यास ॥

पहा आतां नाहींच मिशी त्याला ।
म्हणुनि म्हणतों नापास खास झाला ।
मिशा नसुनी माशाच तिथें दिसती ।
किती दुःस्थिति नापास जाहल्यांची ॥

पास होता तर मिशी पिळवटून ।
हंसत फिरतां तो मोदवृत्त कथून ।
असा त्याचा मज खेद बहू झाला ।
तोंचि मित्रानें पाहिलें आम्हांला ॥

म्हणत 'गुड्-गुड्' माझाचि धरुनि हात ।
बसवि खुर्चीवर नेउनिया आंत ।
'पास झालों मी', हंसतमुखें वदला ।
चकित होउनि मी न्यहाळीत त्याला ॥

पास म्हणशी मग मिशी काढण्यास ।
काय कारण वद ? बोललों तयास ।
'खरा हिंदू तूं' बोलला हंसून ।
ठेव ध्यानीं ही फ्रेंच कट म्हणून ॥

# पातली दिपवाळी राजसे

कवि—द. भि. रणदिवे, कोल्हापूर.

सुटति न अजुनी बाण नयनिचे वेगवान तीव्रसे ।
पातली दिपवाळी राजसे !
फुगले नाहिंत अजुनि गुलाबी गालाचे अनरसे ।
पातली दिपवाळी राजसे !
दन्तपंक्तीच्या रांगोळीचे उठति न अधरीं ठसे ।
पातली दिपवाळी राजसे !
उधळि न जिव्हेची फुल-बाजी वक्र फुलांचे पसे ।
पातली दिपवाळी राजसे !
मुरड न मानेच्याहि करंजिस गोड गोडशी बसे ।
पातली दिपवाळी राजसे !
प्रेमदेवतेच्या प्रेमाचे दिवे न लागति कसे ।
पातली दिपवाळी राजसे !
कलह कारणा हात नव्या रंगाचा बसला नसे ।
पातली दिपवाळी राजसे !
सुरम्य रुसव्या रोषणाइचें दृश्य मुखीं नच दिसे ।
पातली दिपवाळी राजसे !
आपटबार पायांचे करिति न कर्ण अजुनि बधिरसे ।
पातली दिपवाळी राजसे !
यांविण व्हावें माझ्याकडुनी लक्ष्मी-पूजन कसें ? ।
पातली दिपवाळी राजसे !

---

# अबोलापत्र !

कवि—वासुदेवसुत कारेकर-कोल्हापूर.

वृत्त—दिंडी.

घडी कोऱ्या कागदाची करूनी
घालतांना पाकिटीं ती बघूनी
मित्र बोले, "हें काय असें साचे ?"
" पत्र आहे भार्येस अबोल्याचें ! "

---

# तर्क-मित्र-काव्य-किरण

कवि—'श्रीहरियंत्र' धुंडिराज कृष्ण आष्टेवाले, उज्जयिनी.

विषयीं प्रीती म्हणुनि भजन का हरिचें न करावें
पापें झाला रोग म्हणुनि कां औषध नच घ्यावें १
सुवर्ण नच म्हणुनी का सुशील न वरावा
न करि खुशामत अर्जदार तरि न्याय न कां द्यावा २
पास परीक्षा बघुनि बसा का शक्तिविषयिं गप्प
सोनें घ्यावें घेउं नये का तिजोरि, कडि, कुलुप ३
घोस लोंबले द्राक्षांचे जरि दारीं तरि काय
ज्वार, बाजरी, गव्हा, तांदुळा, कोणी नच खाय ४
लोंबवील नथ मोत्यांचीही नाकीं जांवाई
बघूं नये मुळि विद्याऽविद्या त्याची कां कांहीं ५
बाइल रुसते फुगते म्हणुनि का आइस बोलावें
सेवक म्हणुनी काय तयाला सदाच निंदावें ६

मोटर असली घरीं म्हणुनि का पदीं न चालावें
विद्या असली फार म्हणुनि का विनया सोडावें ७
ताल येइना म्हणुनि काय जनिं सुस्वर नच गावें
ख्याल येइना संगीतें मन काय न रिझवावें ८
माल मिळेना खाया तरि का उपास काढावे
काल जाइना म्हणुनि सदा का पत्ते खेळावे ९
आग लागते घरा म्हणुनि का घरें न बांधावीं
मृत्यू घेतो प्राण म्हणुनि का विद्या न शिकावी १०
अजीर्ण होतें म्हणुनि काय कुणि अन्न कधिं न खावें
स्वराज्य न मिळे झणी म्हणुनि का प्रयत्न सोडावे ११
भाषा मोठी दुसरी तरि कां अपुली सोडावी
सुबक अधिक पत्नि न म्हणुनि काय् ती न अदरावी १२
गास्तिवान पथिं फिरति म्हणुनि का दार न लावावें
श्रीमंतीला मान म्हणुनि का गुणवान न व्हावें १३
गोड आम्रफल म्हणुनि काय तें कोयिसकट खावें
दाते आतिशय उदार तरी कां अगदिंच नाडावें १४
खडे रुतति पायांत म्हणुनि पदिं जोडे घालावे
रुतति मिशा मुख म्हणुनि काय तें अगदिंच मुंडावें १५
हितकर कडव्या वचा म्हणावें काय कटू वचन
सिंह ओरडे मोठ्यानें जरी तरी तो गर्दभ न १६
नटुनी थटुनी चहा पिऊनी कर्मयोग होतो
उंची वस्त्रें घालुनि होतो पुष्ट अधिक जर तो १७
नाटकांत आणि सिनेमांत किती फुलतो खुलतो तो
संन्याशाला पंक्तिस घेतां चिडतो कां रुसतो १८

---

# हातरुमाल-माहात्म्य

कवि-श्री. बा. अ. पाटील, मुंबई.

आर्या

साम्राज्य आंग्लपतिचें हिंदुस्थानांत रंगल्यावरती ।
वस्तू सुधारणेच्या हिन्दुजनां अमित लाभल्या सुगती ॥
हातरुमाल तयांतिल एक असे अतुल या जगामार्जीं ।
जरि हा दिसे पहाची हीच जरी पट्टि नरशिरीं योजी ॥
जपाति प्राणाच्या परि ठेविति उरभागिच्या खिशांमाजीं ।
कोणी स्वकरी धरुनी मिरवत जातात घनसमाजीं ॥
परिट घडीचा कोणी वापरिती कोणि कधिंहि जया ।
दाखविती लेशहि ना पाण्याचा, परि हवा रुमाल तया ॥
सोन्याची जर किंवा मौक्तिकजालासि लावुनी भंवतीं ।
शोभविती किति हरिचे लाल, तया बघुनि लोक मानवती ॥
कोणी सुगंधित करी दर घडिला सिंचुनी सुगंध जला ।
हरघडि नाक पुसोनी, करिती कोणी कुगंधिनें भिजला ॥
पूर्वी योजिति शालू गमतें घर्मा पुसावयासाठीं ।
उपरणि-पंचा-धोतर, उपयोगीं आणिली तयांपाठी ॥
उपरणि-पंचा यांचा उरलासे फक्त अस्थिपंजर तो ।
निःशत्रु अतां उघड्या माथ्यानें या जगांत वावरतो ॥
वक्षस्थलिच्या बैसुनि 'पॉकेटीं' तिर्कि मान करुन बघे ।
कामीं तत्पर राहे घटिकायंत्रापरी सदैव रिघे ॥
घर्मम्लान मुखाला किंवा घ्राणेंद्रिया पुसायाला ।
तत्पर सदा असे हा, आळस त्यातें धजे न शिवण्याला ॥
केला सुगंध स्पर्शित तरि येई दरवळासि बाहीर ।
पसरुन गंध दशदिशां करि निजपालकसुकीर्ति जाहीर ॥

डोळ्याआड धरुनि ये प्रेक्षाया इष्ट वस्तु गुप्तपणें ।
तोंडाआड धरोनी साधे गुजगोष्टि हळुहळू करणें ॥
हक्क असे पुरुषां परि तल्ललनांना कमी नसे लवही ।
हें सिद्ध करायासाठीं युवती-गणही नवाइ घे जणुं ही ॥
नर नुसतें अग्र परी, सर्वहि बाहेर सोडिती आर्या ।
कटिला खोचुनी शेवट दाविति पतिहुनि कमी नसे भार्या ॥
करितां लंकादहना वायुसुता स्वेद फार ये, असतां—।
हातरुमाल करीं तरि अचपळ काढून घाम तो पुसता ॥
भावें करी समर्पण बोरें जीं रामचंद्र करिं शबरीं ।
त्यांतें हातरुमालीं ध्याया होतें बहूत सुकर तरी ॥
कृष्णें चोरुन खातां गोरस, तें माखलें बघुनि वदन ।
धरिती गोपि तया, हा असतां तरि मागमूस कळतां न ॥
नेतां मदिरा पात्रा सैरंध्री कष्टलीं कुगंधें तें ।
असतां कटिला हा तरि लाविति झणिं काढुनी स्वनाकातें ॥

× × ×

फेकुनि द्यां पंचातें, मोडा बंडीस, धोतरांच्या या ।
उपरणिचा ध्वज फाडा, यातें निर्वैरता झटा द्याया ॥
नेसुनि इजार घाला, जाकिट शर्टास नेकटाय बरी ।
कोट वरी हॅट बरी, नेत्रीं चष्मा धरील 'शेड' खरीं ॥
हातरुमाल खिशामधिं ठेवुनि बाहेर शेपटा सोडा ।
ओढा नजर जनांची तन्नयना थक्क करुनिया सोडा ॥
हिंदयुवतिनो तुम्हा पाहुनि जन डोलवो सदा माना ।
कमरेस खोंचल्याविण यातें शृंगार पूर्ण नच माना ॥

———

# सांग कसा दिसलों !

कवि–भा. ग. रेगे, बी. ए., सोलापूर.

सहलचि करतां एके दिवशीं
ओळखिलें तव आर्त स्वराशीं
—आणि झगडतां त्या गुंडाशीं
वीर कसा दिसलों ?

अंकुर फुटतां प्रीतिचा मग
ओढही जीवा लागे तगमग
स्थिता पाहुनी गवाक्षिं, तुजसी
—दास कसा दिसलों ?

मौन देखतां गमे सम्मति
मनीं वाटलें चढावी भिंती
परी ऐकतां " आई ! " हांक ती
सांग कसा दिसलों ?

---

# केरसुणी

कवि—वि. मो. पंतपराडकर, बी. ए., सोलापूर.

नमोस्तुते केरसुणे गडे ग । मार्जिनि म्हणती तुला
तुझा हा जन्म असे बहु भला ॥ ध्रु० ॥
मार्गातुनि तव धनिण चालली होती एके दिनीं
विकितसे दुष्ट बया तुज जनीं ॥
विकास पाहुनि तुझ्या फड्यांचा मोद वाटला मनीं
काढिली तुज मीं पाटींतुनी ॥
तुझ्यासारख्या दिव्य वस्तुचा अभाव घरिं उमगुनी
घेतली ऐटदार निरखुनी ॥
मग वारिसिंचनें आली तुज शुद्धता
कुंकूम लावुनी झालीस तूं मंडिता
बहु दिसलीस चंचल तोऱ्याची पंडिता
ना मिळे तुझ्यासम वस्तु जगीं धुंडतां
उपयोगीं निज देह झिजवुनि उपकृत केलें मला ॥
तुझा हा जन्म असे बघ भला ॥
निशासमय येतों कसा तरी तूं दवडुनी ओटीवरी
प्रभातीं चमकसि ललनाकरीं ॥
अग्रफडांच्या धटफटकारी निर्मलता गृह धरी
धूळ ही नष्ट होय घाबरी ॥
"ललित सृष्टि या ललनानिधिची" वर्णित कवि किती जरी
नष्ट या दुष्ट खऱ्या अंतरीं ॥
तव गरज संपतां धरिती मनिं वांकडें
झोंकिती तुला त्या निष्ठुर ओटीकडे
हें काय म्हणावें प्रेमपरी फांकडें
कीं मोल जयाचें ऐसें हें रोकडें

अक्षम्य तयांचा दोष जरी हा राग नये तूजला ॥
तुझा हा जन्म असे बहु भला ॥
कालावधिनें तुझ्या स्वरूपीं धाड घालिते जरा ।
मृदुल त्या अग्रांचा करि चुरा ॥
कार्यक्षमता क्षीण होऊनी स्थैर्य नाश हो खरा
तरी तूं सेवेसीं तत्परा ॥
ओटी सोडुनी दारीं बससी दिससी अति जर्जरा
प्रभातीं रस्ता झाडिसि बरा ॥
ज्या असति कैकया जातीनें मैत्रिणी
वीथींत करीती उच्चावच भांडणीं
निजकरीं धरी तुज बलिष्ठ जी तई कुणी
जी दुर्बल तीचे शीर सडकते झणीं
जीर्ण जरी तूं अजीर्ण बळ तव दूर लोटिसी खला ॥
तुझा हा जन्म असे बहु भला ॥
कान्तिहीन तव देह देखुनी दया मनीं उपजली
आश्रया पोरी तुज अर्पिली ।
उद्योगी तूं चैन नसे तुज तशीच कीं बैसली
काढिसी घाण सदा आंतली ।
एके दिवशीं गोमातेला भूक फार लागली
सत्वरीं तिनें तुला गांठली ॥
येउनी अहह ती मुखा उघडि पापिणी
त्या दुर्धर समयीं रक्षाया ना कुणी
अंगांत बळ नसे होतिस बहु तूं उणी
ती दुष्ट बया मग गट्ट करी तुज झणीं
असा तुझा तो अंत पाहुनी हाय हाय हो मला
कवीचा मानस बहु करपला ॥ नमोस्तुते० ॥

# आम्ही कोण ?

कवि—म. ग. धोत्रे, मुं

'आम्ही कोण ?' म्हणून काय पुसतां ? आम्हीच बेकार ते—
झालों अध्ययना करून अवघे, हो, व्यर्थ भूभार ते,
आम्हां वालि कुणी न आज उरला या नोकरांच्या जगीं
आम्हां दालन बंद; एकहि नुरे सर्कारि वा खाजगी ॥ १ ॥
आम्हां ओळख पूर्ण सर्व दिसती विद्वान (?) वाक्पंडित,
उपदेशामृत कोरडें खपविती निष्क्रीयतामंडित,
कोणी सांगति "हातिं नांगर धरा" कोणी म्हणे " जा करा-
व्यापारा, बहुमोल क्षेत्र पडलें कांहीं तरी स्वीकरा." ॥ २ ॥
कोणी स्वामि म्हणे " करा तरि तुम्ही हें स्वल्प बुट्-पॉलिश '
" देशार्थी तनु " कोणी " आज झिजवा " सांगे पहा बालिश
कोणी हो कवि, नाटक्या कुणि तसा, खंदा कुणी लेखक,
कोणी साधुनि संधिही कशिबशी झालेत संपादक. ॥ ३ ॥
कोणी घालुनि भोजनालय सदा सेवा जनांची करी—
धोबी-कंपनी वा सलून बरवें, कांहीं कुणी तें करी;
कोणी वा फिरतो उगाच इकडे तिकडे मजा मारित
कोणी त्रासुनि दे आलिंगन जणूं त्या आत्महत्येप्रति ॥ ४ ॥

× × ×

आम्हांला वगळा, कशा झिजतिल ऽ ऽ ऑफिसच्या पायऱ्या
आम्हांला वगळा, उदास दुनिया त्या जाहिराती बऱ्या ॥ ५ ।



# तो आणि ती—

कवि—द. ग. जयवंत, कल्या

वृत्त—साकी

आणि लाज-लज्जा दोघांनीं जणूं सोडिली सारी
पहा कधींही बसलेलीं तीं शेजारीं शेजारीं
परस्परांवर कटु विरहाचा प्रसंग कधिं यावा न
म्हणुनी बसती अन्योन्यातें जणूं मिठी मारून
नाटक, सर्कस, सभा, सिनेमा पहावयाला नित्य
रात्रंदिन जातांना दिसते हें प्रेमी दांपत्य
रहावयाचें सदन तयांचें सुंदर ठसकेबाज
डोकीं वर काढुनियां बघती न कळे कसली मौज
वर्णानें 'तो' असुनि सांवळा, 'ती' तर गोरीपान
वर्णभेद हा कसा ठेविला ईशें ? कांहिं कळे न
देह तयाचा कंटक असुनी, मृदुल तियेची काया
तिजशेजारीं मौज वाटते म्हणुनी त्यास बसाया
सुधारणा ही काय विसाव्या शतकांतील म्हणावी ?
शृंगारिक वृत्तीची त्यांना लज्जा काय नसावी ?
कांहिं असो; परि सदा जोडपें रत हें जनकार्यांत
" जनसेवा " हें ध्येय सर्वदा ठेवुनि एक मनांत

× × ×

रसिका ! हें दांपत्य कोणतें ? जाणिलेंस कां चित्तीं ?
फौंटन पेन खिशांतील "तो" अन् घडी रुमालाची "ती"



# मिशांतला पांढरा केस

कवि–प्रो. रा. बा. पन्तोजी, एम्. ए, उज्जैन.

वृत्त–वियोगिनी

मज केस मिशांत पांढरा
दिसला बाण शरासती खरा
निरखून पहातसे मला
हृदयीं तीव्र नितांत बोंचला १

वर शुक्र दिसे; असे तरी
अति काळा जणु तो निजांतरीं
चमके जशि कांत ती वरी
पण काळा लपवी निजोदरीं २

अथवा हंसते नभीं जरी
तरी काळी किति रात्र अंतरीं
वरुनि स्मित हें विधी करी
सरसावी हंसरी जणू सुरी ३

अथवा कुणि गौरकाय हा
जणु कप्तान नवा उभा पहा
करुनी वदनास खालती
उभि काळी रिजिमेंट खालिं ती ४

फुटुनी निज जातियांतुनि
दुसऱ्याचा वर रंग लाउनि
निज कृष्ण कृतीस झांकुनी
जणुं ॲंग्लोवर होय का कुणी ५

अथवा नदिच्या तटावरी
झुडुपाआंत बसे बकापरी
वर निर्मल कांति शांतसा
दिसतो, आंत न हा तरी तसा ६

कुणि काढिति पांढऱ्यावर—
जरी काळें, पण रम्य अक्षर
विपरीतच रीत ही परी
उलटा लेख-विधी विधी करी ७

शिरकावुनि पाय पांढरा
भिववी राम ! तुला अतां जरा
तनुचा रथ ने हळू जरा
दिसला 'सिग्नल' दावि 'डेंजरा' ! ८

कधिंही दिसला न जो कुणा
शिरला तो सितकाय पाहुणा
वदनावर पाय पांढरा
पडला सावध राम ! हो जरा ९



# निंदा

( भुजंगप्रयात )

कवि—**वि. ज. सहस्रबुद्धे**, मिरज.

तुझ्यासारखे गोड वाटे न कांहीं
तुझ्यासारखें श्राव्य कांहींच नाहीं
तुझ्यावीण काल क्रमायास इष्ट
नसे कोणता मार्ग लोकीं वरिष्ठ १

सुखाला जगीं तूंच आहेस हेतू
खरी एक विश्रांतिची साउली तूं
मनोरंजनाचें तुझ्यासारखें तें
मला नाढळे स्थान अन्यत्र कोठें २

तुझ्या संगतीचा नसे वीट कोणा
तुझ्यावीण तो काळ कंटाळवाणा
तुझ्या लागले लोक नादीं प्रभूत
वसे मोहिनी दिव्य कांहीं तुझ्यांत ३

जशी शिक्षिताला अडाण्यास तैशी
जशी श्रीयुता निर्धनालागि तैशी
स्त्रियांना जशी पूरुषांनाहि तैशी
प्रिया तूं जगीं सर्व लोकांस हौशी ४

तुला साधु दोषास्पदा लेखितात
तुझ्यापासुनी दूर ते राहतात
परी कोणि नाहींच निर्दोषपूर्ण !
तुला निंदिणें योग्य नाहीं म्हणून ५

जिथें चार एकत्र होतात लोक
तिथें येउनी ठाकसी तूं विलोक
तुझ्या स्वागतावांचुनी बैठकीला
कधीं कोणत्या रंग नाहींच आला ! ६



# वॉशिंग्टन आणि बाळ !

कवि—अनंत अन्तरकर. मुंबई.

" कुणी येथें सांडली असे शाई ?
काय बोलत कोणीच कसें नाहीं ?"
पुसे गर्जुनि जैं पिता, तदा बाळ
पुढें धैर्यानें ठाकला खुशाल ॥ १ ॥

" खरें वॉशिंग्टन जसा बोलला तो,
तसें बोलुनी शाबास म्हणुन घेतो "
असें कांहींसे मनीं पुटपुटून,
तोंड उघडी मग धैर्य एकवटून,— ॥ २ ॥

" मीच....बाबा...." हे शब्द मुखीं येती,
कान दोन्ही तों लाल निळे होती !

× × ×

आणि भानावर बाळ पुन्हा आला,
ठाम निश्चय तैं मनीं तयें केला,— ॥ ३ ॥

" दिव्य तत्त्वें पुस्तकीं वाचण्याचीं,
वाचुनिया सोडून द्यावयाचीं,
आजपासुनि कानास खडा लावीं,
खरें पुनरपि कधिं बोलणार नाहीं ! " ॥ ४ ॥

# मनीषा

कवि–भा. कृ. जोशी, झांशी.

( वृत्त–भिल्लीण )

ऑफीसर व्हावें मिळतें वेतन भारी
दाराहि मिळावी मग कॉलेजकुमारी ॥ ध्रु० ॥

छोटाच मिळो आश्रम दोघांस रहाया
कॉम्पौंड असावें सुंदर बाजुंस चारी ॥ १ ॥

बाजूस मनोहारि असो बागबगीचा
खालील निगा राबुनिया तेथ फुलारी ॥ २ ॥

आचारि स्वयंपाक कराया, घरकामा
बाई अथवा नोकर ठेवीन पगारी ॥ ३ ॥

ऐटींत निघूं घेऊनि मोटार फिराया
नांवास असो शोफर वेळेवर तारी ॥ ४ ॥

पेटीवर बैसून तिनें गाऊनि गाणीं
त्या गानतरंगांवर मारीन भरारी ॥ ५ ॥

छे ! फार अलंकार नको भार कशाला ?
कानांत कुडीं, मोहनमाला रुळणारी ॥ ६ ॥

साधेंच खुलें पातळ तो झोक निराळा
रूपास कशाला नव वस्त्रें जरतारी ॥ ७ ॥

प्रेमांत तिच्या मानिन मी तुच्छ जगाला
त्याव्रीण जिवाला बरवी एक फकीरी ॥ ८ ॥



# दैवाची निर्दयता

कवि–दत्तप्रसन्न कारखानीस, मुंबई.

वृत्त–दिंडी

नाथ गेले कामार्थ अन्य गांवीं
पत्नि विरहार्ता व्यथित मनीं होई;
रात्रिं डोळ्याला लागला न डोळा
ध्यास पतिचा सारखा सुंदरीला !

उषःकालीचा मंद मंद वात
करी निद्रांकित तिजप्रति निवान्त,
सत्य सृष्टींतिल जीव भागलेला
स्वप्नवलयीं लागला रंगण्याला !

दंग झाली ती स्वप्नमालिकेंत
तिला वाटे पति साद घालितात !
भास वेडिस तर होत हा नव्हे ना ?
सत्य किंवा हें स्वप्न आकळे ना !

शब्द अर्धस्फुट वदुनि असे कांहीं
उठुनि मंचकिं लवमात्र उभी राही;
तोंच दारावरि थाप पुन्हा येई
खुळी लगबग सोत्कंठ धांव घेई !

× × ×

–––हाय ! दैवा !! परि काय घात झाला !
द्वारिं भय्या आढळे दूधवाला !!!

———

# मति-विभ्रम

कवि--**गांगेय**, उमरखेड, वऱ्हाड.

कोणत्या मानूं मी घना ?
भूवरीच्या की नभीच्या--मानूं ॥ ध्रु० ॥

बघुनि सखिकडे वाटे हृदयीं ।
मेघ कशाला मम गृहिं येई ।
बघतां गगनीं मेघ तिथेंही !
वरितें मानस भयद कल्पना ॥ १ ॥

भुवनीं वर्षा गगनीं वर्षा ।
काळ्या झाल्या सर्वहि आशा !
वाटे दिवसा आली दोषा ।
प्रलय काळ जणुं ये संहनना ॥ २ ॥

एक नाचवी मोर-पिसारा ।
दुजा नाचवी मम संसारा ।
एक वर्षवी वारीधारा ।
दुजा अश्रु मम आणी नयना ॥ ३ ॥

एका पोटीं वीज कडकडे ।
हास्यि दुजाच्या जीव धडधडे ।
भंगवि नादीं एक नगकडे ।
दुजा भाषणीं आणि मूर्च्छना ॥ ४ ॥

एक रथीं वायूच्या बसतो ।
दुजा मनोरथ मम पिटाळितो ।
एक महीवरि पंक पसरितो ।
दुजा लेप दे तनुवरि नाना ॥ ५ ॥

हाताखालीं शिपाई हवालदार, साहेब म्हणणार,
सलाम करणार दरारा लोकांत ॥ ४ ॥
कीं बरी गार्डाची नोकरी, प्यांट बूट घाली,
साहेबी टोपी शिरीं, निशाण हातीं धरी, शिटी तोंडांत ॥५॥
आगिनगाडींत खूप बैसावें, गांवोगांवीं जावें,
नातलगांस न्यावें, पैसे न द्यावे, स्टेशनावर ऐटींत ॥ ६ ॥

---

# पावडरची डब्बी !

कवि—ना. ग. काणे, बी. ए. नागपूर.

"पावडरची डब्बी माझी—पाहिली किं काय ग !
सांग गडे प्रेमाताई—संशयास जागा राही
तुझ्यासारखी मुलखाची—द्वाड कुणी नाहीं ग ॥
हंसूं नका ग पोरींनो—हंसूं नका हृदयसखींनो
जीव गडे खालीवरतीं—तिजशिवाय होई ग ॥
कां म्हणोनी केली चोरी ?—अन् पुन्हा अशी शिरजोरी
लाज मुळीं अगदीं बाई—कां तुम्हांस नाहिं ग ॥
भांडकुदळ मजला म्हणतां—तुम्हांसवें बोलत असतां
माझि मला बोलायाची—चोरि झाली काय ग ॥
पुरे पुरे थट्टा मेली !—कॉलेजाची घाई झाली
सर्वजणी म्हणतिल 'सुशिला—काळि झाली काय ग !' ॥



# काव्य-संन्यास !—

मामा रामभजनी, नागपूर.

( शार्दूलविक्रीडित )

"दांतांच्या करुनी फण्या विचरल्या वेण्या तुझ्या म्यां घरीं
केव्हां शोधुनिया तुझा उकिरडा मी लोळलों ज्यावरी
काढोनी कधिं गर्दभस्वर तुझीं म्यां बीरुदें गाइलीं
देवी ! ह्या बछड्यावरी अणुपरी दृष्टी न त्वां फेकिली !
तूझ्या फुल्ल प्रफुल्ल वल्लरिवरी चेष्टूनि मल्लूपरी
त्या भल्लातक पल्लवांत चरलों खिल्लार हल्ल्यापरी
डल्ला मारुनि पिल्लु होउनि तुझ्या गल्लींत उल्लूपरी
आलों मी कविते ! न गल्लत तुवां केलीच माझी पुरी
ओहोळीं विकसावया तव, रितीं केली पुरी मत्कुपी
तूझ्या भक्तगणीं तरीही ठरलों मी फक्त ' हुप्प्या-कपी '
तूंते सेवुनिही अखेर कविते ! आली न तूला दया
जातों कायमचाच सोडुनि तुला संन्यास मी घ्यावया ! "



# बोरीबंदरवरील विरामचिन्हें

कवि—बाळ शंकर देशपांडे, द. हैदराबाद.

( शार्दूलविक्रीडित )

घेवोनी पडशीस स्कंधिं उतरे तो खालती बापुडा
होता शोधित अन् कुण्यातरि जिवा मुंबापुरीच्या तदा
दृष्टीतें पडला न तो म्हणुनिया लागे पथा आक्रमूं
घ्याया स्वल्पविराम, तो क्षणक्षणीं लागे पडाया जणूं !

जायाचें मजला कुठें ? अजुन कां येई न कृष्णंभट
पत्ता काय बरें ? कुणास पुसणें ? हें प्रश्नचिन्हांकित
येती त्या समयीं विचार असले प्राण्याचिया धावुन
जोड्या स्त्री-पुरुषांचिया बघुन हो उद्गारवाची मन !
टाकीली पडशी कशा तरी कुण्या बाकावरी कीं तयें
केला अर्धविराम तेथ, गमलें तेथून हालूं नये;
येई तों प्रभुतें दया; निजसखा ताराबया धांवला
तन्मित्रस्वरुपें अहा झडकरी घेई उडी त्या स्थला !
बोले 'भक्त' गणू, मनी, वहिनी अन् मोत्याहि चंपी तशी
हीं एकेक समर्थ आज नसती आनंद द्याया मशीं !
सर्वांचा परमोच्च संगम गड्या जेथें असे जाहला
मित्रा पूर्णविराम त्या तव घरीं दे शीघ्र आतां मला.



# कारटा

कवि--मिलिंदमाधव, मुंबई.

साहेब गेला बनून । कारटा । साहेब गेला बनून् ॥ ध्रु० ॥
चार बुकें तो इंग्रजि शिकला
देव, धर्म सब विसरुनि गेला
माणुसकींतुनि अगदिंच उठला
शेंडि-मिशी काढून् । कारटा । साहेब गेला बनून् ॥ १ ॥
रोज सकाळीं प्रथम हजामत
विड्या पांढऱ्या बैसे फुंकत
सगळेजण तोंडावरि थुंकत–
पिकें पान खाऊन । कारटा । साहेब गेला बनून् ॥ २ ॥

रूप गोजिरें काळसावळें
परी पांढरें फिक्कट केलें
( जणू पांढरें कोडचि फुटलें ! )
पिठ कसलें फासून । कारटा । साहेब गेला बनून् ॥ ३ ॥
मलम सुवासी केसां लावी
हात सारखा वरुनी फिरवी
सूट, बूट घालुनिया मिरवी
गळां फांस लावून । कारटा । साहेब गेला बनून् ॥ ४ ॥
जमवुनि सगळया चटक-चांदण्या
खिदळत खिदळत जाई फिरण्या
खुशाल नाचे घेउनि त्यांना
'तिला' मला विसरून् । कारटा । साहेब गेला बनून् ॥५॥
'तिचा' मात्र तो तरिही 'माणिक'
प्रेमाचा बनला परी पायिक
मड्डम बाईल केली आणिक-
गेला हात धरून् । कारटा । साहेब गेला बनून् ॥ ६ ॥



# कविता गाऊंच नका

कवि–आनंद, चिपळूण.

चाळे हे जुल्मि बडे, कविता गाऊंच नका
स्वर-भेसुरि त्यांत पुरी ! दांत-ओठ खाऊं नका
गातां उंदीर घुशी तालाच्या होत चुका
घोळवितां फिरफिरुनी ! वेळ, कुवे जाई फुका,

चुळबुळ होऊन मनीं—
ओढुनियां श्रोतृ-जनीं—
मारितील संधि बघुनि
अंत उगा पाहुं नका
चाळे हे जुल्मि बडे, कविता गाऊंच नका ॥



# सत्य न कोठें कां दिसतें ?

कवि—हरिश्चंद्र किसन दिवटे, राहुरी.

सत्य न कोठें कां दिसतें ?
मिथ्यचि सारें हें गमतें ? ॥ ध्रु० ॥
नीतीचा जो डोलारा हा ।
सजविलेला जणूं पसारा ।
पिवळें सगळें सोनें कां तें ? । १
सत्य बोलणें जें असतें तें ।
तेंहि बोलणें चुकतें गमतें ।
कैसी ऐसी रीतहि दिसते । २
प्रेम आंधळें जणूं भिकारी ।
त्यासही दिसतो भेद जिव्हारी ।
असेंहि वदतें प्रेमळ भरतें । ३
भिकाऱ्यासही भीक हवी ती ।
प्रेमालाही प्रेम हवें तें ।
सत्यचि मग कां दडुनी बसतें । ४

कुटील नीती भरली जगतीं ।
राज्यसूत्रही हिच्याच हातीं ।
प्रेमा ठायीं ! भेद कशातें । ५
प्रीतीची मग हूल कशाला ।
तोहि मुलामा गमतों मजला ।
व्यर्थाचि शिण हा दीन जिवातें । ६
कासाविस ही व्यर्थ जिवाची
सत्य शोधण्या त्या दीनाची
आस न कांहीं व्यर्थ नरातें ! । ७

---

# वृद्ध न्हावी

कवि—र. बा. खुपेरकर, कोल्हापूर.

[ जाति–मुद्रिका ]

प्रतिरविवारीं मी वाट तुझी पाहतों
तव मूर्ति दिसतां दारीं अंतरीं अती तोषतों. १
तूं परंपरेनें आलेला नोकर
कृति काय तुझी वर्णावी!—तूं प्रसिद्ध कारागिर. २
जरि अससी पिकलें पान्, नेणुनी मनीं
तूं शिताफिनें फिरवीशी तव शस्त्र, न तें परि रणीं. ३
तूं तासपट्टी जरि करिशी डोइची
परि आणुनि देशी सौख्यें इहलोकीं तीं स्वर्गिचीं ! ४
करुनिया डोइच्या केसांची कत्तल
मिळविशी दिगंतीं कीर्ति अन् तसें कर्मकौशल ५

करुनिया दाढि तुळतुळित रेशमापरी
लाविशी तैल अंगाला, विंचरिशि शिखा नंतरीं. ६
रगडुनी अंग बहुपरी नंतरी करीं—
ती इष्ट बिदागी मिळबुनि समजशी धन्यता खरी. ७
ज्यापरी पूर्वजांतरीं मिळे आसरा,
त्यापरी उचित शब्दांनीं वर्णुनी देत 'वस्तरा'. ८

---

# कावळोपंत

कवि–श्री. वी. ग. कौजलगी, हैदराबाद.

( दिंडी )

दिव्य पक्षी हा कोण बैसलेला ॥
तुंग वृक्षाच्या शिरस्थानिं, काळा ॥ १ ॥
पौर्णिमेचा तो चंद्र नभीं झळके ॥
हरित वृक्षीं हा काक प्रभा फाके ॥ २ ॥
दीर्घ चंचू, एकाक्ष, तोच कर्ण ॥
किती गोंडस सावळा कृष्णवर्ण ॥ ३ ॥
मधुर शब्दाहि उच्चारि 'काव-काव' ॥
पक्षि गमतीचा अहा ! पहा राव ॥ ४ ॥
चित्ति याच्या नच दुजा भाव साच ॥
आंत काळा बाहेरही तसाच ॥ ५ ॥
कधीं महिषाच्या बसे पृष्ठभागीं ॥
चोंच मारुनि खावया रक्त मागी ॥ ६ ॥

नेत्र एकचि परि व्यापि सर्व धरणी ॥
काकराजा तव थोर अशी करणी ॥ ७ ॥
असिसि गायक तूं खड्या अवाजाचा ॥
फिका पडतो पंचमहि कोकिळेचा ॥ ८ ॥
सार्थ झाले मम कर्ण पहा दोन्ही ॥
कृष्ण पक्ष्या तव मधुर गान-श्रवणीं ॥ ९ ॥
थांब, मीही तुजसवें येत दूरी ॥
काव्य संपवुनी मारण्या भरारी ॥ १० ॥

---

## दूधसागरास—

कवि—वामन, नवीन गोवें.

दूधसागरा ! थांब जरा तरी-कोण तुझी घाई,
कवनीं तुजला रेखायाला आला कवि पाहीं !
थांब थांब क्षण एकचि तरि तुज निरखूं दे नीट,
कविच्या हृदयीं स्फूर्ति विनटली बघ कांठो कांठ !
ठराविकांचे बांधहि गेले फुटुनी या वेगीं,
भरारिचा स्वच्छंदपणा करि नृत्य चित्तभागीं !
कोण निष्ठुरा चालविलेसी जीवाचे हाल,
क्षणोक्षणीं बदलसी स्वरूपा—खराच चवचाल !
दुग्धाचा तूं सागर म्हणवुनि कशास मिरवीशी ?
सांगशील कां कुणी फोडिला दूध-घडा शीर्षी ?
रावबाजिनें दिधल्या ब्राह्मण-भोजनिचा भात
इंग्रज-मंत्रें उडत उडत तो पडला कां येथ ?
कुण्या कवीनें बाड उघडिलें निज कवितांचें हें
रसिकाभावीं केविलवाणें पडुनि काय राहे ?

सदर्न्‌मराठा आगगाडिनें हदरुनि ये झीट
म्हणुनी सुटला घाम होउनि धीराचें पीठ !
मधें थबकलीं दिग्विजयी हीं मिशनरिचीं घोडीं,
पल्याड दिसली काय तयांना मसुर्‌करी दाढी !
गंगा-भागिरथींचा तांडा काय चालला हा,
स्त्रीदाक्षिण्याचें उधळित कीं धर्म-रहस्य महा !
पोर्तुगाल-इंग्लंड-लगिन कीं लावाया पाट
निज सीमेवरि गोमंतक धरि हा अंतर-पाट !
महाराष्ट्र-कर्नाटक थकले भाषणिं म्हणुनी
ध्वजा उभविते गोमंतकही ऐक्या घडवूनी !
काय दिवाळी सजवीयेली लाठीशाहीची
सत्याग्रहिंनीं उधळुनि अशिही लूट क्षाराची !
गाल तोडितां हिंददेविनें वांझट म्हणुनीयां
गोमंतक-स्नुषा ही गाळी संतत असवां या !
सफेत पायांच्या या—नकोच, कशि न तुला कींव,
बघ सोसाट्यांत कल्पनांच्या गुदमरतो जीव !
तुझ्या गतीशीं स्पर्धा करण्या हा श्वासोच्छ्‌वास
द्रुतगतिनें कीं पहा चालला—करि कासावीस !
काय गड्या ! तुज मोल न ठावें कविच्या प्राणाचें,
हेंचि खरें कीं केंवि कळावें जरठा नवतीचें !
हाय ! चापसंभ्रम निकटीं ये ठुमकत तालसुरीं
म्हणुनी जडता सर्वांगावरि करीतसे स्वारी !
पुरे करी तव खेळ असा हा जीव घ्यावयाचा,
येतों आतां ठेवीं कविवर लोभ परि सदाचा !

---

# अभाग्याची देवास प्रार्थना—

कवि—श्री. बा. यरगट्टीकर, गुणदाळ.

वृत्त-शिखरिणी

असे कांता माझी कठिण हृदया निष्ठुर अती ।
तिनें लोकीं सारी मम मळविली दिव्य महती ॥
सदा चित्ता भ्रांती पडुनि बनलों मी जडमती ।
प्रभो ! आतां मातें तुजविण जगीं अन्य न गती ॥ १ ॥
गृहालागी ये मी दमुनि, शिणुनी, भागुनि जधीं ।
तधीं नष्टा खोंची अमित अपुले वाक्शर हृदीं ॥
कधीं पाहीना ती हंसत मजला निष्ठुर-मुखी ।
झणी देवा ! गेलों तरिच मग मी होइन सुखी ॥ २ ॥
सुरम्या वाणीतें वदुनि मजला ती न रिझवी ।
विषादें ती बुद्धया वदन पदराखालिं दडवी ॥
गमे मातें ती कीं, खचित पतिता मानव-शुनी ।
तिच्यासंगें कालक्रमण करणें योग्य न जनीं ॥ ३ ॥
घरीं पोरेंबाळें सतत कलहालागि करिती ।
दटावूं मी जातां मजवरिच आघात करि ती ॥
मला नेटें लोटे करकर रदां खाउनि दुरी ।
ममायुर्वर्षें तीं भरतिल कळे ना कधिं पुरीं ॥ ४ ॥
कहाणी ऐशी ही कथन करण्या लाज गमते ।
बहू दुःखावेगें मम हृदय भारीच कढतें ॥
तयालागीं आतां त्वरित शमवायास सदया ! ।
दयाब्धा ! तूं माझ्यावरि वळ तुला येउनि दया ॥ ५ ॥

---

कवि--ना. कृ. कदम, मुंबई.

नीज न ये तर बोलत बसावें
अथवा सिनेमा जाऊन् बसावें
कोण करी हें जीवें भावें ?
ते माझे नाथ १

वदन माझें खिन्न बघोनी
हंसत नाहीं हें जाणोनी
कोण हंसण्या मज लावी
ते माझे नाथ २

हंसतां मजला पाहुन हंसति
××× सारखे किति तरि घेति
परि अंतरिं जे तृप्त न होती
ते माझे नाथ ३

परदेशीं जातां रडलें पाहुनी
भेटति मज एकांतीं येउनि
बोलति हाताला धरुनी
ते माझे नाथ ४

स्मरण त्यांच्या प्रेमाचें होई
तव त्या प्रेमा सीमा नाहीं
कैशी होऊं मी उतराई ?
ते माझे नाथ ५

---

# वधुवृत्ति

कवि–नारायण बळवंत पैठणकर, वकील, पारनेर.

( शार्दूलविक्रीडित )

१

मुद्रा पांढुरकी, सदैव रडकी, वक्रा तनू रोडकी ॥
सर्वांगीं कडकी, उरांत धडकी, शक्ती असे थोडकी ॥
घालीतो तुटकीं भिकार मळकीं वस्त्रें सदा फाटकीं ॥
दैवाची फुटकी म्हणून पडलें याच्या घरीं नेटकी ॥

२

याचें तोंड असें किती उकटिलें, काळा किती रंग हा ॥
देहाची तरि उंच काठी कितिही रोडावलेली पहा ॥
केसांनीं उर, मांडि, पाठ भरली ती अस्वलाच्यापरी ॥
केसांचाच सुकाळ फार दिसतो याच्या शरीरावरी ॥

३

जाऊ भांडतसे कुरापत उगा काढून ती तंडती ॥
कागाळ्या करिते नणंद कळिचा आनंद जीला अती ॥
सासू हांसुन लाजवी सुख तिच्यापासून नाहीं मला ॥
नित्याची रड ही कधीं कड कुणी माझा नसे घेतला ॥

४

माहेरीं मज बंधु भावजय हे नानापरी बोलती ॥
येथें जाऊ नणंद दीर अवघे निंदून हेटाळिती ॥
तुम्ही अप्रिय बोलतां, नच तुम्हापाशीं मदर्थ क्षमा ॥
याचा अर्थ जिवंत मी असूनही मेल्यांत आहे जमा ॥

५

[ चंद्रकांत राजाची कन्या, या चालीवर. ]

काळ-मुखीं मी पडतें याचा खेद मला नाहीं ॥
दैव-बलानें घडतें तेथें मार्ग नसे कांहीं ॥ १ ॥

परंतु चिंता एक जाळिते माझ्या हृदयास ॥
माझ्या मागें या बाळाला घडेल वनवास ॥ २ ॥

अल्प वयाचें अजाण, नाहीं अजून जग ठावें ॥
आश्रय नाहीं यास कुणाचा ! हाय कसें व्हावें ॥ ३ ॥

येईल सवत माझ्यामागें राज्य तिच्या हातीं ॥
हा ! हा ! दैवा रक्षील कशी या बाळाला मग ती ॥ ४ ॥

कठिण सांगती वज्राहुनी मन असतें सवतीचें ॥
उलटें काळिज, करुणा नाहीं लव हृदयीं त्यांचें ॥ ५ ॥

चित्त दुभंगे, काळिज भंगे आत्मा-कळवळतो ॥
या बाळाला पाहुन माझा जीव करप घेतो ॥ ६ ॥

उघडें पडलें पाडस माझें यावर प्रेमाचें ॥
वस्त्र आपुलें असो निरंतर, पुढें दैव त्याचें ॥ ७ ॥

# आगबोटींचें भजन

कवि–विष्णु हरि निजसुरे, बी. ए., धुळें.

अभंग

१

तीन शिडें सहा बंब । दिसतसे जी अगडबंब ।
खांके उतारू सुकाण । नित्य समुद्राचें स्नान ।
माथां शोभे धूर फार । अंगिं डामर सुंदर ।
मेरु म्हणे जी नांगर धरी । तिला नित्य नमस्कारीं ॥

२

येग येग बोटमाई । माझे मुंबईचे आई ।
इंजिन आणि पंखा । तुझ्या पेटीमध्यें देखा ।
त्यांचेसहित गे त्वां यावें । माझ्या बंदरीं लागावें ।
भज मुंबईस न्यावें । रुजू चाकरीवर करावें ।
माझा रंग तुझे गुणीं । बोले मेरू ऐशी वाणी ॥

भजन

बम्ब नांगर सुकाण । इंजिन यंत्रें तेल घाण ॥

# मुलाखत

कवि–अ. पां. साबळे, उमरावती.

बैल पोळ्याचे । विद्यार्थी सजले साचे ॥ ध्रु० ॥

उद्यां मुलाखत प्रिन्सिपालशीं
जो तो लागे सांगु स्वतःशीं
घालूं झुलहि ऐशी खाशी
लक्ष सकलांचें । वेधुनि जी घेईल साचें ॥ १ ॥

सूट बूट ते घेती उसने
मूख चोळती स्नो-पावडरनें
इंप्रेशन अन् छान मारणें
साध्य हें त्यांचें । एंजॉय लाइफ करण्याचें ॥ २ ॥

वडील इकडे रात्रीचा दिन
करिती मेहनतीनें खपुन
चिरंजिवाशीं एक भूषण
फक्त मुलींचें । हृदय-गड सर करण्याचें ॥ ३ ॥

म्हणुन मुलाखत माझ्या हृदया
संसाराचा गमतो पाया
व्यक्तिशः कर्तृत्व दावया
दिवस सोन्याचे । शंख वा जगीं करण्याचे ॥ ४ ॥

# " अर्धे "

कवि—य. स. कोरेकल, द. हैदराबाद.

वृत्त— शार्दूल-विक्रीडित

अर्धे लक्ष कुठेंतरी बहकलें अर्धे असें सन्निधीं ।
अर्धे थांबुनियां फिरोनि परतें अर्धेच चाले मधीं ॥
अर्धे लक्ष पुढें परंतु दुसरें चालू असें अंतरीं ।
अर्धे बाह्यदशेंत साह्य करितें अर्ध्यांत कांहीं तरी ॥ १ ॥

अर्धा कोट उरावरील उघडा अर्ध्याच गुंड्या किती ।
अर्धा भांग दिसावया कलतिशी टोपी शिराभोंवतीं ॥
अर्धी दृष्टि म्हणूनिया बसविला द्वैय्यर्ध चष्मा भला ।
अर्धोन्मीलित नेत्र ज्यांतुनि दिसे ऐसा कुणी चालला ॥ २ ॥

अर्धा भाग तदीय अस्थिर असा घाईमुळें होतसे ।
अर्धश्मश्रु म्हणोनि का दिसाति ! कीं सारेंच भासे तसें ? ॥
अर्धा ज्या स्थलिं कीं उजेड असतो अर्धाच जेथें तम ।
अर्धे ज्ञानचि वैपरित्य पटवी तेथेंचि सारा भ्रम ॥ ३ ॥

अर्ध्या या वसुधेवरी रवि फिरे अर्धाच तोही दिनीं ।
अर्धी उर्वरिता तमांत फिरते अर्धी प्रकाशांतुनी ॥
अर्धी सुंदर चंद्रकोर कलती साऱ्यांस संमोहवी ।
अर्ध्याची महती गणूं किति जरी पूर्णांश ती थोरवी ॥ ४ ॥

अर्धें तें असतें म्हणोनि भ्रमती मोठेहि येथें सदा ।
अर्धा भाव सदैव घातुक महा त्याच्यामुळें आपदा ॥
अर्धेंही तरि हेंच संतत नसे दूज्या क्षणीचें दुजें ।
अर्धें विश्व ! तरीच एक पलही ज्ञानी इथें ना रिझे ॥ ५ ॥

---

# किती करूं अजून ठणाणा ?—

कवि—ज्ञा. वा. दिवाकर, बार्शी.

" प्रेम करावें । प्रेमानें झुरुन मरावें ॥
जरी प्रेयसी काळी असली ।
किंवा किंचित स्थूल भासली ।
नकटी अन् दन्ताडी दिसली ।
प्रेमाळावें । तिज प्रेमें कुरवाळावें ॥ १ ॥

आज कालचे दिवस बुरे हे ।
सौंदर्याचें थेर पुरें हें ।
रूपवती तुज न मिळे, तूं हें ।
ध्यानीं घेई । वय वेड्या व्यर्थचि जाई ॥ २ ॥

सुंदर नारी फारच घातक ।
होशिल कवि तूं, तें रे पातक ।
जाण राजसा होइल जाचक ।
ऐक मम बोल । सांभाळी अपुला तोल ॥ ३ ॥

( हातवारे करून )

तूं हा असला तुझें असें हें ।
पुढें तुझें होणार कसें हें ।
जाचे रात्रंदिन मजला हें ।
कसें समजेना । किती करूं अजून ठणाणा ? ॥ ४ ॥

# संपादकांची चाळणी

कवि—कृ. र. चव्हाण, वर्धा.

" पहा पहा तें पुडकें कसलें ?
कविता का हो ?
शीर्षक सांगा."
'—स्वातंत्र्याची जिवंत ज्वाला—'
" कोण कवी तो ? नांव काय हो ?
बी. ए. अथवा एम्. ए. कुणी ?
प्रसिद्ध आहे विशेष का ? हो ! "
'नाहीं !'
" हं ऽ ठेवा गुंडाळुनि
विशेष कांहीं नसेल ऐसें
पुढें करूं मग पिचार त्याचा." १

" आणि काय तें ?"
'काव्यचि हेंही.'
" कसलें ! कुठचें ?
कोण प्रणेता ?
नांव बघूं द्या."
'तुझा कटाक्ष !'
" दुसरें कसचें ?"
'खिडकीमधुनी'
" ठीक !
बघूं द्या आणा इकडे.
कोण प्रणेता !"

‘ कवि—प्रोफेसर....
पुणें शहर’
“ हं ! जपून ठेवा ! ” २

“ ही कोणाची ?
नांव काय पण ?”
‘ उठा तरुण हो !’—
आंग्ल-विभूषित प्रसिद्ध कवि श्री० कवींद्र यांची.
“ वाहवा ! आणा मग इकडे.” ३

“ हें—हें काय हो ?”
‘गद्य लेख हा’
“ नांव काय ?”
‘स्वातंत्र्य-दामिनी !’
“ लेखक पण हो ?”
‘कुमार........
कां ?
अंहं !” ४

“ आणिक तें हो ?
‘लेखाचिही हा.”
“ नांव तयाचें ?”
‘स्त्री-स्वातंत्र्य !’
“ दुसरा कसचा ?”
‘वांकडी नजर’
लेखक....बी. ए., एल्एल्. बी.
“ छान ! छान ! !
वा ! आणा तर मग ”

" बरें !
काय तें ?"
' नाट्यछटा ती–'
' हिंसा-हिंसक सत्य अहिंसा '
लेखक—श्री० ........
वय सोळा वर्षें.
" अंहं ! जाऊं द्या.
इतकेंच पुरें.
नसल्या वेळीं पडतील कामीं. " ५
" हें–हें पण हो ?"
' कविता आहे.'
' क्रांति-दंतिनी '
' कवि–बालकवि........
" जलाल आहे.
द्या ठेवोनी." ६
" दुसरी कसची ?
सुंदर दिसते"
'जुलमी सत्ता चिरडून टाका'
' कवि—बॅरिस्टर कैटभारि '
" वाह् !"
" द्याच तिला आणा द्या इकडे."
' हीही पण जलाल आहे ना ? '
" हरकत नाहीं ! कां भीता हो ?
पुढचें सारें पुढें बघूं मग ! " ७

---

# बेकाराचे उद्गार !

कवि—गो. वा. सारोळकर, मुंबई.

चाल—-असा धरि छंद.

काय करावें कोणाशीं शरण रिघावें ! ॥ ध्रु० ॥

विचारचक्रीं चक्कर पडली ।
आजकाल तर कोणि न वाली !
दैवा कोठें सीमा नुरली ।
कोठें पहावें कोणाशीं शरण रिघावें ॥ १ ॥

नोकरी कोठेंच नाहीं म्हणती ।
मला बघूनी भिकारि गणती ।
खायाला ना भाकर पुरती ।
चहा बिस्किटांवरि कां दिवस क्रमावे ॥ २ ॥

कोणी म्हणती भूतपिशाच्च ।
कोणी म्हणती ग्रहदशाच ।
कोणी म्हणती दैवगतीच ।
नाना मार्गें फसविती हो साधिति कावे ॥ ३ ॥

फीगर खेळा कोणी सुचविती ।
बना शेतकरी कोणी सांगती ।
व्यापार काढा कोणी म्हणती ।
प्रयत्नें पैसाहि मिळेल कर्म करावें ॥ ४ ॥

---

# बृहन्महाराष्ट्रांतील कवी




(१) शं. ब. कुलकर्णी (२) शं. ना. बर्वे (३) वामन (४) भालचंद्र जोशी
(५) ना. कृ. फाटक (६) बी. माधव (७) वासुदेवसुत कारेकर
(८) दासविटू कोल्हारकर.

# रास तफारीस

सौ. विमला, नागपूरकर.

आमुच्या मराठी भाषेमध्यें असा वाक्प्रचार असे बुधा ।
—" कीं शहाण्या माणसानें लागुं नये कधीं मोठ्यांच्या नादा ॥"
राष्ट्रसंघावर ठेवुनी विश्वास पडलास या रणकंदनिं घोर ।
इतरांना फसविति तरी आपसांत प्रामाणिक रहाति चोर ॥

---

# प्रमिला वेडी

कवि—गोपाळ वावीकर, बी. ए., इन्दूर

प्रमिला वेडी । करिते ती नित्याचि खोडी ॥ ध्रु० ॥
चष्म्याला मम हात लाविते,
दौतीला झणिं सांडुनि देते,
रागें भरतां उलटचि हंसते !
पाटी फोडी । करिते ती नित्यचि खोडी ॥ १ ॥
मोठ्यानें मी वाचित असतां,
वदते ती मग हंसतां हंसतां,
" उगाच ऐसें कां बडबडतां ? "
कैसि लबाडी ! करिते ती नित्यचि खोडी ॥ २ ॥
रस्त्यावरुनी माळिण जातां,
बोलावी तिज दाउनि हाता,
परी लपे ती माळिण येतां !
कोण ही खोडी ? करिते ती नित्याचि खोडी ॥ ३ ॥

‘ मोत्याला ’ ती खाउ दाविते,
येतां झणि तो लपवुनी घेते
भुंके तो जंव धांवत चढते—
वरची माडी ! करिते ती नित्याचि खोडी ॥ ४ ॥

वही लेखणी घेउनि हातीं,
वेडीवांकुडी काढि आकृती,
‘चित्र बाईचें बघा ! ’ वदे ती
हात ते जोडी ! करिते ती नित्याचि खोडी ॥ ५ ॥



# सवत ग बाई !

कवि—सिताराम गणपती मणेरकर, नवागोवा

( चाल—भाक्ति ग वेणी— )

सवत ग बाई । ही विडी न वैरिण होई ॥ ध्रु० ॥
बिजवर म्हणुनी ठाउक नव्हते
वधु मी पहिली समजत होतें
आतां कळे विवाहित होते.
फसलें ग बाई । ही विडी न वैरिण होई ॥ १ ॥

कुब्जेसम जी वक्र तनूची
वान्नरि जैसी कृष्णमुखाची
मलिना खनि जी दुर्गंधाची
रुचलि ग बाई । ही विडी न वैरिण होई ॥ २ ॥

षड्रस भोजन झाल्यावरही
देतें सुगांधि तांबुल तरि ही
सकाळीं मुख जरि धुतलें नाहीं
विसर न बाई । ही विडी न वैरिण होई ॥ ३ ॥

लक्षुमिची ही वडील अक्का
घालवि हळु तिस मारुनि धक्का
भिक्षांदेही असल्या हक्का
शिकवि ग बाई । ही विडी न वैरिण होई ॥ ४ ॥

बोलति जेव्हां घाणाचि येई
खोंकाति ऐसें झोप न येई
जो घरिं भरला निघुनि न जाई
दर्प ग बाई ॥ ही विडी न वैरिण होई ॥ ५ ॥

थुंकुनि थुंकुनि घर रंगाविलें
रंगा अधरींच्या घालविलें
अकालिं वृद्धत्वा आणियलें
विटलें ग बाई ॥ ही विडीं न वैरिण होई ॥ ६ ॥



# अखेरची आशा !

कवि—गो. ल. आपटे, बी. ए., एल्‌एल्. बी., पुणें.

कुणी निन्दा भरपूर मम करोत
स्तुती कोणी वाटेल ती करोत
उभारूं दे स्मारकेंही कुणाला
गिधाडेंही फाडोत शरीराला !




देवराया प्रार्थना या जिवाची
नको कविता मजवरी रे कुणाची !



# कॉलेज कन्येचे निराशेचे उद्गार!

कवि—**पुरुषोत्तम मांडवगणे**, उमरावती.

( चालः—समझमें न आवे माया. )

प्रेमबाई करुनी फसल्यें, प्रेम नाटकी
कपटजाल माया लटकी, ती भुताटकी

प्रेमपंकिं कैक निमाले
रंकाचे रावहि झाले
शोकसागरींही दडले, दीन संकटीं ॥ फसल्यें०

सर्वस्वा मुकलें चुकलें
आज पाश सारे सरले
अविचारें छंदीं जडलें, घोर पातकी ॥ फसल्यें०

शुष्क बेगडी देखावा
अंतरिचा दुसरा कावा
धिक्कार अशांचा बरवा, सुलभ न्याय कीं ॥ फसल्यें०

प्रेमाचा एक इषारा
मोहाला सत्वरि आवरा
कॉलेज पसारा सारा, शीलभ्रष्ट कीं ॥ फसल्यें०



# वाजली तर वाजली !—

कवि—'बी' माधव, पुणें.

कविते जा झडकरि येथून—
  बघ, मुद्त गेलि संपून ! कविते०
असुं दे तव हा वेष बावळा !
मुद्रेवरती दीन अवकळा !
कोण पाहतो उघडुन डोळा !
  बालिके बसूं नको ग रुसून !—

---

# येउं नको परतून !

कवि—दासविठ्ठ कोल्हारकर, राहुरी.

प्यार जिवाची । कलिजा माझी ।
  घेई जनां मोहून । कविते० ॥ १ ॥
लेववुनी तुज । बहुपरि लेणीं ।
  पाठविलें नटवून । कविते० ॥ २ ॥
रूपवंत तूं । शीलवंत तूं ।
  देइ जनां पटवून । कविते० ॥ ३ ॥
संपादक वर । तुला योजिला ।
  घेइ प्रीत जमवून । कविते० ॥ ४ ॥
नावडूनी वा । अन्य कारणीं ।
  साभारें परतून । कविते० ॥ ५ ॥
वशिल्याची वा । मध्यस्थीची ।
  'उणीव' मम जाणून । कविते० ॥ ६ ॥

शक्त न मी तुज । संपादक या ।
सुखवाया आंतून । कविते० ॥ ७ ॥

जाणुनि माझी । परिस्थिती तूं ।
स्थळ मिळवी दिपवून । कविते० ॥ ८ ॥

'ब्रह्मार्पणम्'

---

# समाधि-भंग !

कवि—पु. वि. रहाळकर, नाशिक.

जाई रंगुनि दंग मानसिं अती कोणी युवा वाचितां
रम्या ती कविकालिदास-रचिता शाकुंतलाची कथा
होई चित्त तदा प्रफुल्ल मनिची वृत्तीहि ती बावरी
राही दृष्टिपुढें सुरम्य वन तें आनंदला अंतरीं
वाटे त्या निज वल्लभेसह तिथें क्रीडा प्रमोदें करी

प्रेमें नर्म, विनोद, भाषण अहा ! तें प्रेम उन्मादक
वाटे धन्यच जोडपें निजपरी तें प्रेम निर्हेतुक
जाई तो विसरूनियां जगत हें तैसें स्वतांला सुखी
येई स्वानुभवा नितांत मधुरा गोडी समाधीमधीं !—  २

वर्णाया न समाधि शक्य असली आनंदि आनंद तो
बापाचे परि येति ऐन समयीं कर्णावरी शब्द तों:—
" हुंडा तीन हजार रोख मिळतो ! नक्की तरी जाहलें
जोशी मुन्सफ ते !—मुलीस मग त्या कां हो हवें पाहिलें ? "— ३



# वज्राघात—!

कवि–के. डी. कुलकर्णी, पुणें.

तार वाचुनी हर्ष जाहला—
तिला, तिच्यास्तव मीं दावियला
कां ? तें ठाउक माझें मजला
जरी काजवे चमकुन गेले माझ्या दृष्टिपुढून १

तिचीच मैत्रिण एक जिवाची
सुटी काढण्या उष्णकाळची
येण्याची ती तार तियेची
तार कशाची मम जीवाची वावडीच ती जाण २

दत्त म्हणुनि तो सुदिन उगवला
गृहभाग्याला पार न उरला
टांगा दाराशीं खडखडला
धाउनि, स्वारी सामानासह घेतलि मीं उतरून ३

जाइ दिवस तो आनंदाचा
बाजार न मज पुरावयाचा
गुलाम बंदा मी हुकमाचा
दीर्घ काळचा संचय जवळिल परि गेला संपून ! ४

कांहिं दिवस ते ऐसे गेले
मम भाग्यानें तोंड फिरविलें
ध्यानिं मनिं न जें तें उद्भवलें
कढूं लागली हवा कां न मग वादळ तें होणार ! ५

संवय हंसुनि मज बोलायाची,
तिच्या मैत्रिणिस मृदुभावाची
आणि तीस चोरुनि बघण्याची
अशा प्रकृती केंद्रीं येतां, विघ्न कसें टळणार ? ६

एके दिवशीं बागेमधुनी—
फुलें आणिलीं सुंदर खुडुनी,
होती हांसत उभी पाहुणी
त्यांतुनि तिजला गेंद गुलाबी दिला एक निवडून ७

चमत्कार तों घरांत घडला
दूध जाउनी सर्व उताला
चहा कडू चिवडाहि करपला
कडू जहालें तोंड, तेथुनी, गोड कसें होणार ! ८

एके दिवशीं घरीं पाहुणी—-
नाहीं ऐशी संधी बघुनी
बसली होती जिथें स्वामिनी
हळूच जाउनि—-गाल....मनधरणी करणार ९

× × ×

—-तोंच भुवन तें सर्व हदरलें
वस्तु मात्र डळमळूं लागलें
तोंड कडू अन् कानहि झाले
पुरे जाहलें बाष्कळपण हें बसा लांब सटकून ! १०



# चप्पल तिची पाहुनी !

य. ना. मोघे, ग्वाल्हेर.

[ सुनीत ]

माहेरीं जरि जाउनी अजि तिला महिना पुरा जाहला
नाहीं पत्र न वा खुशाल कळलें अद्यापिही तें मला

पत्ता मी लिहुनी स्वतः तिज दिलीं होतीं दहा पाकिटें
हलगर्जीपण यामुळें सहजची तें मन्मनाला पटे

पाहूं वाट किती मनास अथवा कोण्यापरी रंजवूं
नसतां नाटक कंपनीहि पुढती रात्री कशा घालवूं

सीनेमांतिल तें प्रिया प्रिय तिची देती करोनी स्मृती
त्यांचेंही बघणें तिच्याविण मला वाटे नको संप्रति

लागे जेवण गोड ना तिजविना वाटे नकोसा चहा
शेविंग–छेः ! न सुचे मुखा कुरुपता त्याच्यामुळें ये पहा

केले अर्ज कितीक ते जरि तरी साहेब सुट्टी न दे
आतां मात्र शिव्या दिल्याविण तया जिव्हा न कांहीं वदे

× × ×

ऐशा त्रस्त मनें घरीं परतुनी येतांच एके दिनीं
आश्चर्यें दिपलों नि गोड हंसलों चप्पल तिची पाहुनी !



# कवि मनमोहनास

कु. मधुमालती.

[ पुण्याच्या रोजच्या वृत्तपत्रांत प्रसिद्ध होणाऱ्या 'अकलेच्या तारका' वाचून सुचलेले विचार ]

वृत्त–पावणा [ इराण्याच्या हॉटेलांतील रूढ शब्द ]

निघती कैशा तुझ्या टाळक्यांतुनी रोज कविता ?
कसा साधिसी विनोद साध्या प्रसंगांतुनी संता ?

किं ठेवियल्या अधिच रचोनी 'गठ्ठाभर' कविता
रोज छापशी एक त्यांतली प्रसंग समरसता

तुझा तुला तरी हिशेब आहे कां पदसंख्येचा
किती बाटल्या रोज पिशी तूं ब्रेन टॉनिकाच्या

स्फूर्ती तुजला रात्रीं येतें कीं भरदिवसांही
शाई कुठली तूं वापरशी ताव कसे पाही

रणशूराचीं गीतें रचिता प्रेम गीत गाशी
तीही सोडुनी आज असा कां विनोदिं रमलासी ?

संपादक तुज विषय सुचवितों कां रे काव्यार्थी
कीं तूं अपुलें मस्तक लढवुन साधिशि परमार्थी ?



# तिनें त्याला परि पाहिलेंहि नाहीं !

कवि— अनंत हरि जोशी, पुणें.

पथीं होउनि, अपघात जखम झाली
आणि सायकलूवरुनी ती येत खालीं !

तिचा 'जिवलग' धांवला सांवराया
तीहि धडपडुनि लागली उठाया

इराण्याच्या शेजारच्या दुकानीं
जाउनीया सत्वरीं जला आणी

स्वीय भिजवोनी रेशमी रुमाल
जखम बांधिता होय तो दयाळ !

तिथें आणोनी स्वयें एक टांगा
करा देउनिया चढविली सुभागा

स्वतां बैसुनि चालवी पायगाडी
आणि बुधवारांतुनी मार्ग काढी !

स्वयें पत्ता सांगुनी वाहकाला
घरा आली, उतरली सुधाबाला

हांसुनिया तो तिच्याकडे पाही
तिनें त्याला परि पाहिलेंहि नाहीं !



# सासूची समदृष्टि !

कवि—गणेशशास्त्री फाटक, कुरुंदवाड.

१

लाल झाली ती, सकाळीं सुनेचा—
पाहुनी तो अवतार त्राटिकेचा !
" केस सारे मोकळे ! पाठमोरी !
आंत काळी; परि वरुनि छान गोरी ! "

२

शुद्ध नाहीं मुळिं दन्तधावनाची !
अर्धी साडी नेसली भरजरीची !!
ढीग सांज्याचा घेउनी बशींत,
गिळे अन्धारीं तोण्ड वाजवीत !! "

३

" कशी पडली ही मुलाच्या गळ्यांत !
मरेना का अवदसा त्या तळ्यांत !! "
तिला डागावें, म्हणुनि निघालीच ?
पाहते तों कन्यका आपलीच !!!

\+ + +

" काय माझी लाडकी छबकडी तूं ?
खा हं, खा; परि मनिं एवढा न किन्तू !!



# कधीं नको !

कवि—बाळ खाडिलकर, बी. एस्सी., काशी.

चाल—अभंगाची

येवो अंगावर पर्वत डोंगर ।
उंच हातावर झेलीन ते ॥ १ ॥

आले अग्निबाण आकाशावरून ।
छाताड करून साहीन ते ॥ २ ॥

हादरो जमीन भूकंप होऊन ।
ईश्वराचें ध्यान करीन तें ॥ ३ ॥

बुडेल पाण्यांत नौका ही भंगोन
गांठीन पोहून पैलतीर ॥ ४ ॥

जरि संकटें हीं येतील मिळून
कृपेनें साहीन एक वेळ ॥ ५ ॥

देवा नको पण एरंडेलपान।
प्रार्थना ही जाण माझी देवा ॥ ६ ॥

तेंही एक वेळ देवा घेई जर
तयाची ढेंकर कधीं नको ! ॥ ७ ॥



# अष्टपुत्रासौभाग्यवती भव!!!

कवि—आ. मो. पाठारे, मुंबई.

( शार्दूलविक्रीडित )

गांजा-भांग-तमाखु-भक्षणिं पुरा दादा सदा थोरला।
भाऊ अट्टल दारुबाज दुसरा, भूषा स्वकीया कुला॥
चोरीच्या कसबांत वाकब तिजा साक्षात् 'झिंगोमार' हा।
धुंडाळी चवथा अहर्निश नवीं रंडा-बिऱ्हाडें पहा॥ १ ॥
जुव्वा, शर्यत खेळण्यांत निपुण भ्राता खुनी पांचवा।
खोट्या साक्षि, सह्या बनावट करी तो साहवा वाहवा॥ !
त्यांचा सप्तम बंधुराज हिजडे—ओढा जडे नाटकीं।
पाही जाळित तें कनिष्ट सुत जो वर्षा उणा आठ कीं॥ २ ॥

( स्रग्धरा )

आठांच्या आठ वाटा—!! अनुभविति; तया तात हर्षातिरेकीं।
कोणाला 'जाब' देती! डंवचाति छळिती लोकरीतीं अनेकीं॥
हर्षाच्या त्या तटाकीं घसरुनि जरठें गाठिली स्वर्गयात्रा!।
सौभाग्याचीच 'बाकी' हरपुनि बसली माउली 'अष्टपुत्रा'॥ ३ ॥

---

# आशाभंग!

कु. संजीवनी, मद्रास.

धंदा विमा—एजंटांचा, कंटाळुन गेला झिजवतां उंबरठा
शेवटीं आफिसांत बसे 'व्हॉउचरें' तपाशित बेटा
रोज नियमानें सखिशीं संबंध होइ फोनानें
'ती' प्रथम तयाला 'कॉल' देइ नेमानें

आला फोन, वाजली बेल, धडपडे हो रिसिव्हरशीं
हाय परंतु सखिऐवजीं बोलली 'ठकाय मावशी'!



# तूं आणि म्युनिसिपल दिवा

कवि–पण्डित सप्रे, पुणें.

दिवा रस्त्यांतला जैसा
तसा आहे तुझा प्रेमा !
न दावी मार्ग पांथस्था
न होई साह्य वा त्याला !

---

# रानारानांत गेली बाई शीळ——

कु.—शशिकला जोशी.

हें ऐकून गाणें जाहल्या कानांच्या भिंती ।
कशाला ताळमेळ नाहीं, संगीत-विटंबना ती ।
गीत कोणीहि श्रवेना का अशी हो फिर्याद ?
नको ' गोरि धीरे ' लाउन पहा करीमखां वस्ताद ।

* * * *

हें असेंच जर रडगाणें कानावर पडणार ।
ॲडिसन् न शोध लावणारा गाढव ठरणार ।



# मी देव झालों तर ?

कवि--श्री. वि. खडपेकर, डोंबिवली.

शार्दूलविक्रीडित

तारे आणिन स्वर्गिचे सकलही जे नित्य शत्रूपरी
स्वर्गीं राहुनि पृथ्वीच्या न सुखीं दुःखास अग्नीपरी
लोटोनी छळिती सदैव मनुजा डागोनि हृन्मंदिर
त्या साऱ्या ग्रहशत्रुंना छळिन कीं, मी देव झालों तर !
सारे नाशिन राहु, मंगळ, शनी, भानूस त्या मन्दता
आणोनी सुखवीन लोक सगळे, चंद्रास तेजस्विता
पाषाणा बहु स्निग्धता अणुनिया, काकास ती सुंदर
काया अर्पिन मंजु गानस्वरही मी देव झालों तर !
ज्योत्स्नायुक्त सदैव ठेविन पुढें रात्रीस सेवेस मी
पृथ्वीच्या गिरीकंदरांतिल भिती काढीन तेथोनि मी
उत्तुंगा शिखरास नम्रपण तें आणीन मी सत्वर
आनंदास भरीन सर्व जगतीं मी देव झालों तर !

---

# सायकलवाला !

कवि–शं. ना. बर्वे, पुणें.

कॉलेजवाला। हा हुशार सायकलवाला ! ॥ध्रु०॥
इजार-बाह्या बंब बोटिचे
डबल ब्रेस्टवर फाउंटन नाचे
टोपिला अन् ××× चाटाचि पोंचे
पोमेडवाला। हा हुशार सायकलवाला !

अस्मानांतुन खालीं आले
मेघ भोंवतीं कसले जमले !
'पासिंग शो'च्या प्रेमामधले
झुरकेवाला । हा हुशार सायकलवाला !

दुरुनि पटेना ओळख पुरती
युवक येतसे किंवा युवती
समजुन आलें येतां निकटीं
हा तर अपुला । बहु हुशार सायकलवाला !

रस्तोरस्तीं गिरक्या मारी
चुकवुनी चुकवुनी अलड पोरी
इंप्रेशन तो मारुनि भारी
दंग जहाला । तो हुशार सायकलवाला !

शाळा सुटण्याची ही वेळ
स्वार चालले जमला मेळ
'आहे ऽ ऽ बुवा ! हें नामी कूळ'
मोदें वदला । हा हुशार सायकलवाला !

*                *                *

मुग्ध बालिका जवळुन गेली
शिटी वाजवुनी जागी केली
पोझीशन परि औट जहाली
ध्यानीं न भरला । हा हुशार सायकलवाला !



# कावळा

कवि—गं. बि. भिडे, बी. ए., हैदराबाद.

कावळ्या मज अससी तूं प्यार ॥ ध्रु० ॥
या जगांत तुज कोणी न भजतो, तुच्छ लेखती फार ।
कोकिळेस त्या वानिती तिजवरि कवनें लिहिती चिकार ॥१॥
गानास तिच्या लुब्ध होउनि वर्णिति अपरंपार ।
ध्वनि कटु यास्तव घालिती तुजवरि सगळेचि बहिष्कार ॥२॥
गाजरपारखि पहा कसे परि विसरति तव उपकार ।
अपकारें फेडिती खचित तें सर्पांचे अवतार ॥ ३ ॥
आपुल्या पिल्लां टाकण्यांत किती कोकिळ बेदरकार ।
वाढविशी परि त्यांस प्रेमें किती रे तूं दिलदार ॥४॥
टाकियलेल्या कोकिलपिल्लां जरि होशि न आधार ।
कोकिलगायन लोकां कैसें ऐकाया मिळणार ॥ ५ ॥
ऐसे असुनी झिडकारिती या दुःखें तूं बेजार ।
क्रोश सदा करिशि त्यामुळें तव सुर कां न बिघडणार ॥६॥
प्रेमळ आहे त्वत्सम नर त्या समजेलचि हें सार ! ।
कोकिलसम कृष्णहृदय अरसिक त्यासि असो धिक्कार ॥ ७ ॥
काव काव तव कळवि बायका पाहुणाचि येणार ।
तारायंत्राचि गमशी कविला किती रे तूं हुश्शार ॥ ८ ॥

× × ×

जोंवरि कवि हा जिवंत तोंवरि गुंफिल त्वद्गुणहार ।
निधनोत्तर परि त्याच्या पिंडा शिव तूं वारंवार ॥९॥



# शहाणा गाढव !

कु. स्नेहप्रभा, सातारा.



गाढवाला 'गाढव' म्हणणारा माणुस त्याहुनही गाढव।
मनुष्यजातीनें ओलांडलि पशुंच्या मर्यादेची शिव।
लेखक प्रतोद घे करि जैं कविसाठीं चाबुकस्वार।
'कवडा' गाढवाचें चर्म घे शरीरीं सोंग करी तय्यार।



# एक करुण कथा !

कवि--द. वि. गुप्ते, मुंबई.

जाति--दिंडी.

उन्हाळ्याचा अति तीव्र ताप झाला,
म्हणुनि ठरलें जायचें नाशिकाला.

झोंप, खाणें भटकणें दोन वेळां,
हाच अमुचा क्रम नित्य नेमलेला !

तोंच पदरीं मम एक पाप आलें,
आणि उचलावें लागलें गबाळें !

चार दिवसांची दाढि वाढलेली
( पोर उपवर कीं, गळा लागलेली ! )

नापिकाच्या स्वाधीन ती कराया
जीव माझा आतूर फार झाला !

''नापिकांनीं कां संप आज केला''
जरा कंटाळुनि बोललों शिवाला

''आनि म्होरं तो कोण चाललेला''
असें म्हणुनि मारिली हांक त्याला !

हातिं चर्माची 'बॅग' घेतलेला,
तरुण नटवा मम दाढि करुनि गेला !

दोन दिवसांनीं समय तोच आला,
आणि दिसतां--खुणाविला 'बॅगवाला'

''ऊन पाणी घेउनि शिवा येई''
असें वदुनी दाविली जरा घाई !

तोंच देखावा—बदल पूर्ण झाला !
आणि कळलें अपराध एक केला !

नेत्र क्रोधानें लाल लाल झाले,
शब्द ओष्ठांतुनि त्याचिया निघाले—

"'तुम्ही 'नापित' 'वकिला'स आज केलें
कुठें अकलेचें फुङ्किलें दिवाळें !

झोंकिली का 'शाम्पेन' एक प्याला ?
काय ठाण्याहुनि थेट येथ आला ?

कसा बुद्धीला भ्रंश आज झाला,
कलम 'आय. पी. चें दावितों तुम्हांला !"

असें गर्जत मार्गस्थ 'वकिल' झाला,
आणि हास्याचा उसळला उमाळा ! !

---

## झडती

कवि—सुरेशबाबू, निपाणी.

"किती विनवूं मी गोडि-गुलाबीनें !
किती वेताच्या, झोडपूं छडीनें !

अशिच माझी कारट्या, झडति देई"
"झडति घ्याया नच गुरू तुझा आई."



# नूर-महंमद

कवियित्री—सौ. शालिनी, बडोदा.



किती मजेदार शोभतो हा मुलतानी छोकरा !
हातांत पेलतो पाही या फटाकड्यांच्या सरा !
गळयांत आडकवी मालाची पाटी स्मितमुखी हा !
मला गडे मनोहर गमे काव्यविषय पहा



# दोन फुलें—

श्रीमंत कु. **अक्कासाहेब पंत, औंध.**

[ जाति—मनमोहन ]

त्या कळ्याकळ्यांतुन फुलें उमलती आनंदें बहरून् ॥ ध्रु० ॥

फूल वेलीवरून डोले
बायुसंगें खेळ खेळे
अव्याज मनोहर लास्य फुलवितें मोहर हृदयांतून् ॥ १ ॥

कटिवरी हें बाळ माझें
फांदिवरती फूल ताजें
कशि झेप घालितें बाळ सानुलें घ्याया कुसुम दुरून् ॥ २ ॥

फूल आणि मूल दोन्ही
मधुर विमला भावनांनीं
दगडास फोडिती पाझर शिशुपणिं मानस आकर्षून् ॥ ३ ॥

बोबडे हे बोल गोड
पाकळ्यांचें गीत गूढ
आनंद समुन्नत उत्साहानें टाकिती विश्व भरून् ॥ ४ ॥

विश्व आनंदें भरावें
हेंच यांना एक ठावें
पण भाव निरागस दृष्ट लागतां कां जाती चुरडून् ॥ ५ ॥



# हिचीं हौस !

कवि—प्रो. वा. गो. मायदेव, एम्. ए., पुणें.

[ चाल—भक्ति ग वेणी० ]

बघ हिची हौस । हिज हवा ग आय्. सी. एस्. ॥ ध्रु०॥
पहा हिची तर नाजुक यष्टी
चहा पिउनि किति चढली कांती
चष्मा बघ हा डोळ्यावरती
हाउ नाईस । हिज हवा ग आय्. सी. एस्.
सशक्त इथला शिकला तरुण
हिजला वाटे खविसच पाहुन
डेलिकेट ना धड मॅनर्स न
हाच चॉईस । हिज हवा ग आय्. सी. एस्.
सुटाबुटाच्या स्वारीजवळुन
मोटारींतून केव्हां मिरविन
हींच स्वप्नें हिज रात्रंदिन
गुड् ग्रेशऽस । हिज हवा ग आय्. सी. एस्.
बापाघरचा पैसा ओतुन
मोटर हुंडा सर्वहि देउन
गुलाम झाली जरि ही पूर्ण
नाहीं व्हॉईस । तरि हवा ग आय्. सी. एस्.
मडम-सुरांनीं पैसा फन्न
झाला तरि ना होइल खिन्न
सोशिल झाली माराहाण
नाहीं सेन्स । पण हवा ग आय्. सी. एस्.

---

# तूं—

कवि—ल. कृ. शिंगारे, नागपूर.

कुट्टकाळी अंगकांती आखुडा गे तुझा बान्धा.
गांवबाजी तुझा धन्दा !
या बटा वाऱ्यावरी गे राठ दोरी तुझी वेणी,
क्रोध, भीति तुझीं लेणीं !
ह्या टपोरी भींवयांची भोर, जोडी भली काळी
लांब कुङ्कू सदा भाळीं !
रागदारी उग्र हांसू आणि किती बरें घोर !
लाल–खूनी तुझे वीर !
जोरदारी भाषणें तीं सूडबुद्धी वसे आंत
साम्य तुझें हिडिम्बेंत !
शूर मर्दानी भुषा तूं कर्कशी गे तुझी वाणी
सूड-प्रीती तुझी आणी !
वाटतें तूं कोण आली कोणत्या वा जगांतूनी !
दारुधुन्दींत मस्तानी ! !



# रूपराणीस

कवि—रा. शि. वळंजु, मुंबई.

वर्णितां भागले तुला कवी
तरि अजुन सखे तूं कशी नवी ?
पुराणकालीं किती कवींनीं
तुझ्यावरूनी रचिलीं गाणीं

नित्य तयांच्या वाटे ध्यानीं
  विहरत होती तुझी छबी.
नवे नवे किती प्रतिभावाले
अमुच्या प्रान्तीं उदया आले
वाङ्मयक्षेत्रीं त्यांचे चाळे
  अन्य तुझ्याविण कोण चालवी ?
प्रतिभेचे किती पाइक पुढती
जन्मा येतील हातोहातीं
तुझीच गातिल उज्ज्वल कीर्ती
  तूंच तयांची उपास्यदेवी !
तुझ्या स्तुतीविण जरी एक कुणी
कवि होण्याची हांव धरि मनीं
हंसें तयाचें खास होय जनीं
  कृपा तयाला तुझी हवी.
रसिक असो वा अरसिक कोणी
तुला मानण्या तत्पर राणी
नवल वाटतें असें असोनी
  वृत्ती कैशी तुझी लाघवी ?
लाघवाचि वा पसरुन माया
झुलविसि या जगतास लीलया ?
म्हणुनिच रमणी रूपा गाया
  नवे जुने आतूर कवी !



## थंडी

कवि–एक्स. एम्. एस्सी., पुणें.

मला थंडी झाली । खूप खूप शिकायचं ॥ ध्रु० ॥
तपकीर ओढीन झट
शेंबूड काढीन फट
यासच काव्य म्हणायचं

---

## दोन कवि

कवि–**मन्दार,** नागपूर.

**एक कविः—**

'प्रसिद्ध होणें जगतीं तुम्हांला
कैसे रुचे' हें न कळे अम्हांला
मदीय 'बाडें' तुम्ही बघा हो
घरींच ठेवोनि गातों कसा हो ! ॥ १ ॥

**दुसरा कविः—**

घरींच ठेवोन 'बाडें' खुशाल
बरें, बरें ! कां नेहमीं बसाल ?
कधींतरी मासिकिं या दिसाल !
अज्ञात वा त्या परडींत जाल ! ॥ २ ॥
भाळीं न येवो अमुच्या म्हणून
वशिल्यानं देतों अम्ही पाठवून
असली कशीही कविता तरी ती
प्रसिद्ध होतां तिचि होय कीर्ती ॥ ३ ॥

---

# ब्रह्माण्डनायक !

कवि--अनंत गोपीनाथ वकील, बीड.

चाल--फटक्याची किंवा छकडची.

भाळीं टिळा गळां ॥ घाली रुद्राक्षांच्या माळा ॥ ध्रु० ॥

भस्म चर्ची अंगा, नटनटवी सोंगा, झांकी साऱ्या व्यंगा, ।
अंतर्यामिचा तो काळा ॥ १ ॥ ॥ भाळीं. ॥

वरी दिसे छान, आंत सारी घाण, परधनीं मन, ।
परनारीवर डोळा ॥ २ ॥ भाळी. ॥

प्रेमें झांकी डोळे, नांक दाबी बळें, अंगीं सर्व चाळे, ।
कैसा गिळूं लांचगोळा ॥ ३ ॥ भाळीं. ॥

लोका सांगें ज्ञान, मायाब्रह्मखुण, उपटाया धन, ।
लावी खोट्या ताळमेळा ॥ ४ ॥ भाळीं. ॥

---

# कालाची कुटिल दृष्टि

कवि---श्रीनिवास नारायण शिंदे, हसूरचंपू [ करवीर ]

[ चाल-लावणी ]

उच्छृंखळ खळ अशेष भक्षक काळ दृष्टि जंव पडे ॥
सर्वांची विश्व सर्व गडबडे ॥ ध्रु० ॥
धूमकेतु उत्पात भयंकर घोर महा गांठती ॥
उडुगण रिचुनि रक्त शिंचिती ॥
रवि-शशि-मंडल धुंद सुनिष्प्रभ पुरुषानिल झोंबती ॥

व्याधी युद्ध जिवा पचविती ॥
ज्वालामुखि, भूकंप, वादळें, प्रवाह, सरितापती, ॥
पृथ्वी रूप बळें बदलिती ॥
प्रलय महा प्रत्यक्ष बागडे घडवी शून्याकृती ॥
चळली व्यग्र जिवाची मती ॥
आधिव्याधी दुःख, भीति, दुर्दशा ॥
अती वृष्टि वा अनावृष्टि दीर्घशा ॥
असह्यरूपें इतिभय ग्रासति दशा ॥
दृश्य अशाश्वत विरुनी पांचामहाभुतांनीं झडे ॥
वायूरूप नटुनि कां दडे ॥ १ ॥

---

# अपन्हुति

कवि—एस्. डब्ल्यू. रानडे, नागपूर.

[ वसंततिलका ]

**स्त्रीः—**

" ना रात्र ना दिवस, सांज न वा सकाळ
चुंबीतसे मम मुखाप्रति सर्व काळ ॥
हा जाहला हुळहुळा मम ओठ बाई
त्यापासुनी परि मुळींहि न दूर होई " ॥ १ ॥

**सखिः—**

" ही तो दिसे सखि विलक्षण रीत लोकीं
तूं साहतोसि तरि त्रास असा कसा कीं ! " ॥

स्त्रीः—

“ ना त्रास या वद सखे मदिया सुखातें
मद्भाग्य थोर मजसी जगिं धन्य वाटे ” ॥ २ ॥
तें तेज सौख्यद किती, सखि, लोचनातें
तें पाणिदारपण कौतुक हो जनातें ॥
ठेवा असा मदिय, गौरव कां न व्हावा ?
ज्या पाहती युवति त्या करितात हेवा ” ! ॥ ३ ॥

सखिः—

“ हें चालतां सतत चुंबन भाग्य होई ?
आश्चर्य वाटत सखे मजसी तुझेंही
लज्जा तरी कशि खरेचि तुझ्या न नाथा ! ”

स्त्रीः—

“ ना ‘नाथ’ हा परि सखे ‘नथ’ चुंबि ओष्ठा ” ॥ ४ ॥

---

# जाऊं नको ग रुसून

कवि—विनायक मार्तंड कुलकर्णी, पुणें.

जाऊं नको ग रुसून—मजवरी
—जाऊं नको ग रुसून ॥ ध्रु० ॥

येथ विखुरल्या स्वैर चिटोऱ्या
हस्तलिखित वा काळ्या गोऱ्या
लावुं या दोघे तयांना पिटून—मजवरी— ॥ १ ॥

तांब्या-भांडें पाणि पिण्याचें
असे गंजलें दो महिन्यांचें
उजळुं या त्रासो तया चोपडून—मजवरी– ॥ २ ॥
विस्कटलेले केस असे हे
दुर्लक्षियले कवितामोहें
बसवितों अतां ग चापून चोपून—मजवरी-- ॥ ३ ॥
परिटघडीचा शर्ट नेहरू
गिरणी-खादी धोतर मारू
जाऊं या फिरावया पेहरून—मजवरी– ॥ ४ ॥
वचन तुला मी देतों आतां
वेंचिन देह न कविता करितां
आतां तरि पाहा जराशी हंसुन—मजवरी– ॥ ५ ॥

---

# दख्खनची राणी !

कवि–बकुलराय, बी., एस्सी. पुणें.

राणी—दख्खनची नवोनव निघे तींतून येई प्रिया
बॉम्बेहून पुण्यास दर्शनसुखें आनंद देण्या प्रियां
पत्रानें लिहुनी अधींच कळवी येणार या गाडिनें
तेव्हां बिल्कुलही विलंब न करा स्टेशन्वरी भेटणें
वाचोनी मजकूर वल्लभ गमे आनंद-वेडा अतां
कांतेच्या विरहें पुण्यांत दिसली होती तया शुष्कता
प्रेमाच्या वचसिंचनें क्षणि कशी सर्वांस ये आर्द्रता
शक्ती संजिवनी अशी वसतसे पत्रीं प्रियेच्या सदा

येतां तो बसुनी दुचाकिवरती रेल्वेपुलाखालुन
राणी येत पुलावरी खडखडां तैं हादरें दख्खन
पाही उंच करून मान दिसली गाडींत राणी तया
झाली टक्कर तोल जाउनि पडे ती शेंगवाली बया.

\+ * +

शेंगा, पेरु मुसुंबिं सर्व पडलीं रस्त्यावरी सीन हा
दुःखें पाहुनिया तशीच सरली वेगांत राणी पहा

---

# कवि व त्याची अरसिक बायको

कवि—टी. बी. बैंड्डाळे, जळगांव.

कवीची बायको—

उठतां बसतां गुणगुण करुनी काय असें बरळतां
कां काव्य करोनी वेड लागलें अतां ॥ ध्रु० ॥
ही गुणगुण चाले संडासांतहि अशी
चालूंच तशी ती घांसतांहि बत्तिशी
वा अंग धुतांना ओवी ये अचुकशी
जेवित असतांनाहि चाले गुणगुण कांहींतरी
वेडेच वाटतां आपण मजला तरी ॥ १ ॥

कवि—

ए ऽ तसें नव्हे ग काव्यच ऐसें असे
तें गुणगुणतांना काय मजा देतसे
हें विश्वच सारें त्यांत बुडालें असे

ऐक अतां मी म्हणुन दावितों भावगीत तें तुला
तो समय तयांतिल हंसविल तुजला फुला ॥ २ ॥

कवीची बायको--

मज नको नको तें रोजच ती किरकिरी
कां दुखे न तुमचें तोंड तयानें तरी
सारखी चालते वटवट कांहींतरी
रोग लागला काव्याचा हा, न कळे कोठुन तरी
घेऊन औषधी बंद करा लवकरी ॥ ३ ॥

कवि--

त्यावांचून सारें तुच्छ वाटतें मला
काव्यांत हंसावें, नाचावें प्रेमला
काव्यांत रडावें भांडावें, वेळला
काव्य जगीं या आहे म्हणुनी वाटत मजला तरी
जगावें जिवलग गे सुंदरी ॥ ४ ॥

---

# आधुनिक अभंग

कवि–वाडेकर, पुणें.

सर्वपात्रीं करावें प्रेम । जात गोत न विचारोन
प्रियाराधना करोन । 'जोडे' विकत घेइजे !
पायाचें भूषण स्लिपर ते जाण । वांकिया पैंजण गृहा शोध
हस्ताचें भूषण 'मानूरकरी' जाण । वेळेचें कारण ओढी ऐसें
कष्टाचें भूषण 'लावण्या' गायन । मदिरापान आणि कांहीं
नेत्रांचें भूषण नारीनिरीक्षण । स्थान जाण एक अनेकांचें



## सिगारेटचें थोटूक

कवि—द. ल. फडके, कोल्हापूर.

सिगारेटीचें थोटूक राहिलेलें । शौचकूपामधिं तेंचि टाकिलेलें
पुंडू आमुचा तो लपत तिथें गेला । पाहुनी त्या उन्माद अती झाला.
शुभ्र सुंदरशी बया पाहियेली । हत्ती छापानें प्रसिद्धीस आली !
तेथ दरवळला गंध फार मोठा । विडी चिलमींचा चालतो न ताठा
धूर सोनेरी निघे छान तेथें । वास घप्‌कन ये असे बया जेथें !

---

## जनरीत

कवि—**नारायणराव ताडे**, उमरावती.

पायीं कंटक रूततां लव रडे धिक्कार त्या षंढ तो ।
भालाही रुततां उरीं नच गणी दुःखा रणीं शूर तो ॥
कांता त्याहुनि शूर धैर्यधर त्या कामी जनांच्या शरां ।
साहोनी हंसती मुळीं न श्रमती ना बाळगीती दरा ॥ १ ॥

लोकाचा गुणि अल्प त्या निशिदिनीं भाटापरी वर्णितां ।
जातीचा गुणशीलवान असतां घाण्यापरी दाबतां ॥
पुत्रा शिक्षण द्यावयास कवडी खर्चावया भीतसां ।
द्रव्य द्यूतसुरादि निंद्य व्यसनीं पाण्यापरी खर्चितां ॥ २ ॥

पर्णें, पुष्प, फळें तशींच सुकलीं काष्टें मुळें साउली ।
देई हा तरु त्यास निर्दय पहा तोडी कृती ना भली ॥
याच्याहून अधीक वाइट गमे फांदी कुऱ्हाडी सवें ।
होवोनी रममाण वंश अपुला तोडी नये आंसवें ॥ ३ ॥

वित्ताशें जगतीं अनर्थ घडती कांता, सुता त्यागिती ।
देशाचीहि मनीं न भीति धरिती मातापिता सोडिती ॥
पापें ही करिती असंख्य जन हे धर्मासही सोडिती ।
ऐसी ही कळिं सार्वभौम नृपराज नीती जनीं सांप्रतीं ॥ ४ ॥

साबू लाबुनि धूतली खरि वरी ती झूलही घातली ।
माळा मौक्तिक पाचयुक्त बरव्या अश्वालयीं बांधिली ॥
स्वारानें सजवून ती गजहयासंगें जरी प्रेरिली ।
मूर्खत्वा विसरे न सूर करुनी लीदीमधें लोळली ॥ ५ ॥

बापाचें न करीच श्राद्ध अतिथी धाडी सदा विन्मुखी ।
हांजी हांजि करी कुकर्म लपण्यासाठीं नृपासेवकीं ॥
नादारी कुडकी तुरुंग सगळे झाले जरी सोहळे ।
माझा मीच हुशार देवहि म्हणे माझ्याच धाकें पळे ॥ ६ ॥



# उध्वस्त फलाट !

कवि–वा. श्री. पुरोहित, बी. ए., नाशिक.

लहान टेशन फलाट एक
मनांत झुरत इष्काची फेंक
  लावुनी प्राणाचा पण
  तिष्ठत कधींपासुन
भेटावी जगांत तुफान वेगी
खेटून रहावी निकट अंगीं ॥१॥

दिवस आणिक अन्धारी रात
सतत मनास प्रेमाची खन्त
  पर्जन्य धो धो धो पडे
  थंडीचा कडाका झडे
उन्हाचा तडाखा सोसुन राही
प्रेमाच्या यातना आनंदें साही॥२॥

हमाल लोटीत लोखंडी गाडी
खडाड टरार हृदय फाडी
  आंतिल भावना-बात
  उलून बाहेर येत
म्हणतो लौकिक उध्वस्त झाला
सहन करी तो जग-निन्देला॥३॥

अन्तर फर्लांग–तेथला खाम्ब
निशाण दावीत म्हणत थाम्ब
  तेथूनि मिचकी डोळे
  ताम्बडे हिरवे–चाळे
पाहूनि फलाट ओशाळा होई
धुळीचा सुस्कारा टाकूनि देई॥४॥

वरती गगन तारका-भरें
आणिक शशाङ्क मोदें विहरे
  प्रेमाच्या चालत गोष्टी
  व्हिस्कीला बर्फाची मीठी
खालून फलाट अभागी पाही
देवाची दुनिया फुलूनि राही॥५॥

पाहाति तेतीस देवांच्या कोटी
कठोर तपस्या प्रेमाच्या पोटीं
  उदार हृदय त्यांचें
  करुणा भरुनी नाचे
मानव धाडिला-सेकण्ड क्लास
कारण-पुरावी तयाची आस॥६॥

धडाड धडाड तुफानवेगी
पाहुनि सिग्नल आडवा जागीं
  खडाड कर्रर उभी
  फुस्फुसे लोखण्ड-नाभी
फलाटअङ्गाशीं खेटूनि राही
वाफाच सोडीत-रागानें लाही॥७

समाधि सम्पली-मनास आला
हर्षाचा उमाळा-बेभान झाला
  श्रमांचें साफल्य झालें
  हृदया हृदय जुळे–
प्रेमानें विकळ निःसंग बने
ऊलत अन्तर उध्वस्त होणें ॥८॥

# जिवाची मुंबई ! !

कवि–स. कृ. नेने, मुंबई.

चला मम्मैला जाऊं भाकर नङ्ग खेड्याची ॥ ध्रु० ॥

वाईवरून पुण्यास ॥
मोटार बारा आण्यास ॥
सोय पुढें बिजलि गाड्यांची १

दर महिन्याकाठीं ॥
कागुद लावी भेटी ॥
संग नोट पांच रुपयांची २

काम पारशी मिल ॥
फिरुं मलबार हिल ॥
जागा खाशी पाहुं भाड्याची ३

चहा-चिरूट-चिवडा ॥
मुखिं रंगे विडा ॥
बॉटल उडाव लिंबु-सोड्याची ४

जाऊं लालवाडी ॥
नग घोडागाडी ॥
सोय ब्येस टराम गाडयांची ५

एक्का छक्का पंजा ॥
किती यांत मजा ॥
लागे चटक मला आंकडयाची ६

अशा आंकडयावारी ॥
पगार पडला भरी ॥
निकड लावी भय्या भाडयाची ७

शेट मागे व्याज ॥
म्हणे नाहीं लाज ॥
कदर राख तुझ्या नरडयाची ८

चटक सुटे नच ॥
व्याज फिटे नच ॥
चोरि केली मारवाडयाची ९

दोन पोलिस सोजीर ॥
चाळी पुढें हाजीर ॥
जागा देती बिनभाडयाची १०



# रुसूं बरें देईन असें !

कवि—अनंत ओगले, कोल्हापूर.

हास्य कधीं तर
अश्रु घडीभर
गम्मत त्यांतचि खरी वसे
शिवाय घडातिल खेळ कसे ? १

प्रणयचांद्रिके
मोद दायिके
फिरवुनि अपुलें मुख तिकडे
रुसलिस कां गे बोल गडे २

दिसण्या नामी
गाल गुलाबी
फुगटुनि बसलिस कां वेडे ?
बोल बोल झणिं प्रणय-गडे ? ३

रुसून बसाशिल
उगाच फसशिल
मुग्ध कलीका जणुं असशी
समजिन तुजला गुणराशी ! ४

भ्रमर होउनी
गुङ् गुङ् गाउनि
उकलिन मी प्रेमें कोडें
फुलशिल मग कां सांग गडे ? ५

मधुर मुग्धता
त्यांत रम्यता
स्मरतां मजला हा आतां
मीहि रुसे तर बैस अतां ! ६

* * *

खेळ संपला
डाव बुडाला
खुदकन हंसुनी तदा वदे
रुसूं बरें देईन असें ! ७

# पायगाडीवरून पडलेल्या प्रणयिनीस-

कवि-शं. द. भोसले, कोल्हापूर.

जाति—दिंडी

असा कैसा तव तोल तरी जाय ?
देखुनी मज हरपलें भान काय ?
झडप भक्ष्यावर घार घालि जैशी
तशी घालुनि धरिलेंस मायभूसी
बोल तिजला गेलीस चुंबण्याला ?
नम्र अथवा द्यावया प्रणामाला ?
हवे होतें कां वसन जाळीदार ?
आजपावेतों नसे काय मार ?
कथायाचें होतेंस मला पोरी !
पुरविण्याची तव हौस हाव भारी !
धूलिमुखिं पडले केश काकवर्ण
शीर्ष मोहक जणुं होय लाल रान
नयन-रंकाळीं अश्रू-पूर आले
रूप वेडीचें तुला प्राप्त झालें
हाय ! गमसी कारुण्यमूर्ति बाले !
देख नयनीं माझिया नीर आलें
वदन-चंद्रा पूस, सर्व नीट
दुष्ट कोणी घेईल " स्नॅपशॉट "
कवी कोणी सोडील काव्य-बाण
नीच लोकांची येथ नसे वाण

कुणी मैत्रिण पाहील हा प्रसंग
टोमण्यांचे सोडील हृदीं नाग
पान अळवाचें हृदय गे ! स्त्रियेचें
कधीं ठेवील न उदक गुपीताचे !

---

## तक्रारी

कवि—अशोक, नाशिक.

( जाति—नवती )

भानुवासरीं बालकें घरीं;
जननिकडे तक्रारी येत कितीतरी.

सर्व ऐकतां समज घालतां
येत तिच्या नाकीं नऊ त्रास चुकविता.

रडत ये लिली " माझी बाहुली
बादलींत बाबूनं टाकुनी दिली."

आणि पलिकडे बाबू ओरडे
" पोहतेच बादलींत बाहुली गडे "

" लिलु उगी बरं बाबुचं घर
बांधु उन्हामधीं आपण—खेळ क्षणभर."

आणखी तिला खाउही दिला
गोड अशा युक्तीनें समजवी मुलां.

तोंच ये सुशी; लोचनें पुशी
"'ताइटली मज म्हणते 'काळि मावशी' "

आणि मोकळा करुनिया गळा
चिडुनिया लागे ती मग रडावया.

होति माउली चिरित तोंडलीं
घाइमध्यें बोटाला लागली विळी.

उठत विव्हळुनी, तों सुशी गुणी
बाहेरी निघुन जाय हळुच तेथुनी.

माय ह्यापरीं त्रस्त अंतरीं
उरकितसे घरकामें ती कशी तरी.

ती दुपारला पहुडली जरा
खेळांमधिं गुंतवून देउनी मुलां.

तोंच तान्हुली बेबि पातली
“ बाबांनीं माललं उं.... ”माय ऊठली.

घेउनी पुढें थांबवी रडें
तों स्वारी आलेली दृष्टिला पडे.

“तूझिं कारटीं येथ हुदडतीं
काम सुचूं देत न मज दंगलींत तीं.”

× × ×

—वदालि हांसुनी पदर लावुनी
“ तुम्हि उरलां होता हो, छान पुरवणी ! ”



# शोधूं मी तुजला कुठें ?

कवि—श्री. ना. कृ. फाटक, कुरुंदवाड.

निद्रा ती मुळिं येइना अजुनिही, शय्येस शोभा नसे;
ये ये गे सखये, विनंति तुजला लागेल माला पिसें !

येईना करुणा तुला अजुनि कां ? छळवाद आहे तुझा;
घे घे घे पुरतें छळोनि अजिला ठेवूं नको तूं वजा !

ऐसें बोलत फार वेळ बसतां दृष्टी पहा हो कशी-
गेली; तों सहजीं तयासि दिसली पायागतीं ती "उशी !"

---

# अग ए ऽ !

कवि—वसंत वैद्य, ठाणें.

"—कुण्या नांवानें मारूं तुज हांक
कवीला नांवांचा शोक

लाडके, सखये, म्हणता तुज प्यार
वाटतें खुलेल तव नूर

मालिनी, इंदू, सरस्वती, बिंदू,
शशिकला, सुमन, सुधा, सिंधू,

इंदिरा, विमला, प्रेमा, भानुमती,
शालिनी, शकुंतला, शांती, १

कमलिनी, पद्मा, मृणालिनी, बाला,
कुमुदिनी, कुमुद्वती, कमला,
द्रौपदी, कुंती, सावित्री, सीता,
अहिल्या, तारा, शर्मिष्ठा
मालती, कुंदा, जाई, फुलवेली,
सायली, लतिका गुळवेली,
कुला वा कांता, हंसा, स्नेहलता
शिखरिणी वा मंदाक्रान्ता २

कवाली, साकी, उपमा, वक्रोक्ती,
हिरकणी, माणिक, रत्नवती.
रोहिणी, चित्रा, स्वाती, अनुराधा,
रेवती, पूर्वाभाद्रपदा,
साहेनी, कॉफी, पूर्वा, मुलतानी,
भैरवी, असावरी, धानी,
नर्मदा, यमुना, वैतरणी, गंगा
मिसिसिपी मिसुरी, चंद्रभागा ३

द्वारका, काशी, मथुरा, पांचाली,
कराची, उज्जयिनी देहली
शिरीन्, मस्तानी, लैला, नूरजहान
म्हणूं कां तुजला ‘ मेरीजान ’ !
एक तव नांव वाटे मज काव्य
कवीचा काव्यावर जीव
बोल ग़े बोल, होउन दिलदार
कोणतें नांव तुला प्यार ?—” ४

× × ×

''जळों तीं नांवें गमती अपशब्द
असे मी युवति घरंदाज
न याचा शोक मजला मी शंख
म्हणा मज 'अग ए ऽ' बिन धोक''
सोडि निःश्वास भरलें नैराश्य
कवीची शोक जन्मरास ! ५

---

# आणि शेवटीं !

कवि–मनमोहन, पुणें.

'' आणी नांव तिचें प्रभावति सुळे; आहे पुण्याचीच ती।
ऐशी सुंदर ! काय देउं उपमा ! रंभा म्हणा वा रती ॥
रॅले गाडिवरी बसूनि फिरतां भारीच मारू दिसे।
केली ओळख मीं कशीतरि अतां जालीम दोस्ती असे ॥
भाऊ एक तिला, वसंत म्हणुनी वीशींतला धांद्रट।
बाँबेला असतो, तयास म्हणतें ती नेहमीं आत्रट ॥
त्याला चिकूटबुनी दिला आलिकडे ठाण्यास कोठेंतरी।
आहे सामिल तोहि यांत; म्हणुनी ये भोगता ही परी ॥
पोस्टाचा थकला शिपाइ, तिकडे तीं प्रेमपत्रें पहा।
होतीं याहुन जास्त काय तिजला माझा निजध्यास हा !
जातों मीहि नि येत तीहि सदनीं होतों चहा-आग्रह।
बापाचा मजबाबतींत पुरता अनूकूल आहे ग्रह ! ''

\+ \+ \+

एटीकेट, झुगारुनी उधळला श्रोता वसंताच तो।
संगित घेवुनि श्री मुखांत पडला प्रेमी उताणाच तो !

---

# लंका

कवि—**कुमार**, नागपूर.

( जाति–मुद्रिका )

होतसें झुंजुमुजु तों कोण येतसे ?
भेऊलवानि भुत मोठें जें मजला भिववीतसे ! १
सांवळी मूर्ति रोड ती देह नाजुक
भेसूर मुखावर तूझ्या रंगेल छटा अंधुक २
शेणास टोपली सवें ति डोईवरी
हातांत घेउनी काठी हिंडतसे सडकेवरी ३
हिंडतसे रानीं लटा— बटा सोडुनी
सांपडतां शेणी वेंचे दिसतांच धाव धावुनी ४
विस्कटल्या दिसती लटा भांग हेकडा
रेखीव मात्र तो नाहीं फांकला ताग फांकडा ५
नेसली फाटकी चिरी वेष शोभवी
माहुरीं–रेणुका माया जयभवानि वा शांभवी ६
लाडवीन अखरावरी जणूं चालली
लागती पोरं तिजमागें जणुं नलिनीभोंतीं अली ७
शोभतो बिजेचा चांद निटीलावरी
पायांत, बांगड्या हातीं घुंगुऱ्या रुणुझुणू करी ८
रावणाचि लंका तशी हिडींबा बरी
गोजिरें रूप हें तूझें मज नसे चारु-सुंदरी ९
बघतांच तुला घाबरे मदिय हा प्राण
कासाविस जिव हा होई सोसवे न बढता तान १०

हृदयांत मुळिंच ना तुझी    मूर्ति बिंबते
तव मधूर आवाजानें    हृदयांस पीळ लागते    ११
हातांत कांकणें भरुन    दाविशी खेळ
धिट चपळ मुलें सारींही    बघतांच काढिती पळ    १२
हा नमस्कार मी तुला    स्फूर्तिदेवते
करतसें ऊठ भोवानी    पळ कशी ! भीति वाटते    १३

---

# न वाजविलेल्या पुङ्ग्या

—उशिरानें का होईना पण विनंतीला मान देऊन कविता पाठविल्याबद्दल मी कांहीं प्रसिद्ध साहित्यिकांचा व्यक्तिशः आभारी आहें; परंतु त्या या आवृत्तींत घेतां न आल्यानें दिलगिरी वाटते—

संपादक

१७. डिसेंबर ३५.

*

# बी. ए. बायको

लेखकः ?

किंमत १ रुपया

आधुनिक जोडप्यांच्या संसाराचें हें चित्र तुम्हांला आकर्षक, आदरणीय व नमुनेदार वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

प्रकाशक :—

महाराष्ट्र पब्लिशिंग हाउस लि., पुणें.